


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

दगडाखाली लपून बसुनी.
पाय खुडकले किती
पाउस आला चला गड्यांनो
आता कुणाची भीती ?




# मराठी अभ्यास परिषद पत्रिका

## भाषा आणि जीवन

वर्ष ११ : अंक ३ : पावसाळा १९९३

## लोकशिक्षण विशेषांक-उत्तरार्ध






अनुक्रमणिका

## अनुक्रम



**प्रकाशन :** त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
**संपादनसमिती :** कल्याण काळे (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, विजया देव, आशा मुंडले, मृणालिनी शहा.
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११००७ (दूरध्वनी ३३६०६१/२४)
**व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा :** मृणालिनी शहा, १, शीतल सहनिवास, ४६।४, एरंडवणे, पुणे ४११००४ (दूरध्वनी ३३३८६९)
**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पाहा.
**सूचना :** या नियतकालिकासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे.
पत्रिकेत प्रकाशित होणाऱ्या लेखांमधील विचारांशी संपादक किंवा परिषद किंवा साहित्य संस्कृति मंडळ किंवा राज्यशासन सहमत असतीलच, असे नाही.
**संपादक :** कल्याण काळे/ **प्रकाशक व मुद्रक :** मराठी अभ्यास परिषदेसाठी मृणालिनी शहा / **लोकशिक्षण विशेषांकाचे संपादन-संयोजक :** आशा मुंडले
**मुद्रणस्थळ :** अक्षर विवेक, रावसाहेब अपार्टमेंट, शिळाविहार कॉलनी, पौड रस्ता, पुणे ४११०३८

# लोकशिक्षणाची घराणी

सामाजिक परिवर्तनाची परिणती आचारामधील बदलामधे व्हावी लागते हे जितके खरे, तितकेच या बदलाची सुरुवात विचारांमधील बदलांपासून होते हेही खरे. पण म्हणजे सामाजिक परिवर्तन मूठभर विचारी आणि प्रतिभाशाली मंडळींपुरते मर्यादित रहायचे नसेल, तर लोकशिक्षणाच्या मार्फत त्यांच्या कल्पना आणि विचार सामान्य लोकांपर्यंत पोचावे लागतात. कधी कधी हे काम एका आंतरिक कळवळ्यापोटी ही विचारी अणि प्रतिभाशाली मंडळी स्वतःच अंगावर घेतात, आणि पर्यायाने लोकशिक्षण कोणत्या पद्धतीने करायचे, याचा एक आदर्शच इतर लोकशिक्षकांना घालून देतात. हा केवळ अमुक एक पद्धती निवडायचा प्रश्न नाही, ज्या विचारांचा प्रसार करायचा, त्यांना अनुरूप आणि ज्या स्वरूपाचे परिवर्तन साधायचे, त्यालाही अनुरूप अशी ती पद्धती असावी लागते.

पत्रिकेच्या लोकशिक्षण-विशेषांकांत (दिवाळी १९९२ आणि आताचा पावसाळा १९९३ हे अंक) लोकशिक्षणाचे विविध नमुने आणि त्याच्या विविध पद्धतींचे विवेचन आलेले आहे. त्यांचे तौलनिक अवलोकन केल्यावर हिंदुस्तानी संगीताची जशी मोजकी घराणी असत, तशी लोकशिक्षणाचीही काही घराणी असतात असे लक्षात येईल.

येशू, सिद्धार्थ गौतम, आणि सॉक्रिटीज हे असेच तीन महात्मे. युगप्रवर्तक ही संज्ञा कंजूषपणे वापरायचे ठरवले, तरी ती या तिघांना लावावी लागेल. हे तिघेही केवळ नवीन विचारांची पेरणी करून थांबले नाहीत, तर आपापल्या विशिष्ट शैलीने ते विचार थेट लोकांपर्यंत पोचवायला झटले. लोकांमध्ये हिंडत रहावे, त्यांचे ऐकून घ्यावे, आणि त्यांना ऐकवत जावे, असा त्यांचा क्रम होता. हा खराखुरा संवाद होता, ही एकतर्फी भाषणबाजी नव्हती, की नेहमीच्या अर्थाने वक्तृत्व नव्हते. कधी लोकांच्या नित्याच्या अनुभवांशी संबंधित दृष्टांत योजून, कधी बोधकथा सांगून, कधी सारगर्भ सूत्रमय वाक्यांची योजना करून त्यांनी आपला काहीसा अमूर्त आशय श्रोत्यांच्या गळी उतरवण्याचा प्रयत्न केलेला आहे. सॉक्रिटीजने तत्त्वज्ञानाची गंगा स्वर्गातून भूमीवर आणली, असे कुणी म्हटले आहे. ते उरलेल्या दोघांबद्दलही सार्थपणे म्हणता येईल. थोडक्यात सांगायचे, तर तिघांमध्ये काही महत्त्वाचे साम्य आहे. परंतु तिघांत काही

फरकही आहेत. येशू एका टोकाला आहे म्हटले, तर सॉक्रिटीज दुसऱ्या टोकाला आहे, आणि सिद्धार्थ गौतम या दोघांच्या मध्ये कुठेतरी आहे, असे म्हणता येईल.

येशूच्या उपदेशाचा बाज 'असे वागा, करा; असे वागू, करू नका; माझे ऐकण्यात तुमचे हित आहे; न ऐकण्यात अहित आहे' अशा प्रकारचा आहे. सांगण्यामध्ये एक अधिकारवाणी आहे, असे वागणे कशावरून हिताचे आहे असा प्रतिप्रश्न श्रोत्याकडून इथे अपेक्षिलेला नसतो. याला 'प्रभुसंमित' किंवा 'गुरुसंमित' लोकशिक्षण म्हणता येईल.

सिद्धार्थ गौतमाची भूमिकाच निराळी आहे – 'असे वागलात, तर त्यात असे हित आहे, असं वागलात, तर त्यात असे अहित आहे; पहा आणि निवड करा; मी आपला तुमचा हितैषी म्हणून सांगतो आहे.' याला 'मित्रसंमित' किंवा 'बंधुसंमित' लोकशिक्षण म्हणता येईल.

सॉक्रिटीज 'मी तुमच्यापैकीच एक आहे' अशा भूमिकेवर असतो. 'असे वागा', 'असे वागू नका' असे सांगण्यापेक्षा 'अशा पद्धतीने विचार करीत गेलात, तर तुमचे तुम्हांला कळून येईल' असे सांगणे तो पसंत करतो. आपल्या कामाची तुलना तो कधी थट्टेने घोड्याला कायम अस्वस्थ ठेवणाऱ्या गोमाशीशी करतो, तरी कधी सुइणीशी करतो. शेवटी विचारासाठी बाळंतिणीला स्वतःलाच कळा द्यायच्या आहेत, याची तो नेहमी आठवण करून देत असतो. आपण लोकशिक्षणाच्या या शैलीला 'सूतिकासंमित' शैली म्हणू! तर्कबुद्धीचे सामर्थ्य आणि तर्काच्या तर्कबुद्धीनेच जाणून घ्यायच्या मर्यादा या दोन्हींची एकत्र जाणीव हे या पद्धतीचे वैशिष्ट्य आहे.

एक लक्षणीय गोष्ट, म्हणजे विनोदाचे अंग सॉक्रिटीजमध्ये सर्वांत अधिक, तर येशूमध्ये सर्वांत कमी आढळते. सिद्धार्थ गौतम याही बाबतीत मध्यममार्गी आहे!

लोकांपर्यंत पोहोचण्यासाठी लोकशिक्षकाला आणखी एक मार्ग आहे. **करमणूक** पत्रिका काढताना हरिभाऊ आपट्यांनी आपली भूमिका सांगताना लोकशिक्षण प्रत्यक्षपणे न करता परोक्ष पद्धतीनेही करता येते, याची समविचारी समाजसुधारकांना आठवण करून दिली आहे. प्रत्यक्षपणे लोकशिक्षण करताना जे पथ्यकर, पण अप्रिय सत्य आहे, ते कधी कठोरपणे, उग्रपणे, रोखठोकपणे तर कधी मवाळपणे, सौम्यपणे पण स्पष्टपणे सांगावेच लागते. पण जे पथ्यकर आहे, ते प्रियही वाटेल, अशा पद्धतीने सांगण्याची ही शैली आहे. प्राचीन भारतीय साहित्यचर्चेत याला 'कांतासंमित' असे मोठे अन्वर्थक नाव दिले आहे. (इंग्लिशमध्ये ज्यांना 'कर्टन लेक्चर्ज' म्हणतात, ती

हीच.) ही चवथी शैली पहिल्या तीन 'उपदेश'पर शैलींपेक्षा मूलतः भिन्न आहे, हे उघड आहे.

या प्रत्येक शैलीचे आपापले सामर्थ्य आहे, आपापली मर्यादाही आहे, किंबहुना आपापले धोकेही आहेत. सुदैवाने व्यवहारात त्या परस्परव्यावर्तक नाहीत. तुमच्या-आमच्यासारख्या लोकशिक्षकाला कोणत्या प्रसंगी कोणती शैली प्रभावी होईल, कोणत्या प्रकृतीच्या लोकशिक्षकाला कोणती शैली मानवेल,आणि कोणत्या श्रोत्याला कोणती शैली हितकारक ठरेल, याचे काही गणित मनातल्या मनात मांडावेच लागते. (लोकांच्या पूर्वग्रहांना आणि भावनांना कुरवाळणे ही मात्र लोकशिक्षणाची शैली ठरू शकत नाही, ती फक्त **लोकानुनयाची** शैली झाली, ती तर जाहिरातकलेची सख्खी बहीण. तिचा विचार लोकशिक्षकाला कर्तव्य नाही, तो एक टाळायचा मोह आहे.)

गमतीची गोष्ट अशी, की श्रोताही या संदर्भात आपले स्वातंत्र्य गाजवत असतो. 'मित्र' सिद्धार्थाला 'प्रभु' बनवणारे निघाले, 'प्रभु' येशूला 'मित्र' बनवणारे निघाले, 'सूतिका' सॉक्रिटीजला त्याचे काही शिष्य महंत समजू लागले, हाडाच्या कवीला उपदेशक मानणारे असतातच.

एवढे मात्र निश्चित, की लोकशिक्षणाची योजना आखताना किंवा कार्यान्वित झालेल्या लोकशिक्षणाची सफलता अजमावताना या भिन्न शक्यतांचे स्पष्ट भान असणे मोलाचे ठरते.

**अशोक रा. केळकर**

# वादे वादे जायते तत्त्वबोधः

मृणालिनी शहा

**प्रास्ताविक**

तत्त्वबोध करणारा वाद कोणता आणि नुसता वितंडवाद कोणता, हे कसे ठरवायचे आणि या तत्त्वबोधजनक वादाचा लोकशिक्षणासाठी कसा उपयोग होईल, हे जर पाहायचे असेल, तर प्लेटोने आपल्या सॉक्रिटीज या गुरूच्या वादपद्धतीचे जे चित्र रेखाटले आहे, ते पाहण्यासारखा दुसरा मार्ग नाही.

म्हणूनच वानगीदाखल प्लेटोच्या निवडक संवादांचे मराठीकरण प्रस्तुत लेखामध्ये समाविष्ट केले आहे. या संवादांची पार्श्वभूमी समजण्यासाठी सॉक्रेटीजच्या जीवनाची व तत्त्वज्ञानाची थोडक्यात ओळख करून घेणे इष्ट वाटल्यामुळे सुरुवातीला तसा प्रयत्न केला आहे. संवादांवरून होणारा बोध वाचकांना सॉक्रिटीजची लोकशिक्षणाबद्दलची भूमिका समजण्यासाठी उपयुक्त ठरावा.

सॉक्रेटीज या ग्रीक तत्त्ववेत्त्याचे चरित्र अत्यंत विलक्षण आहे. त्याचे व्यक्तिमत्त्व विरोधाभासपूर्ण आहे, असे म्हटले जाते. 'सुप्रसिद्ध, सूक्ष्मबुद्धीचा व उच्च दर्जाचा तत्त्ववेत्ता असून 'जगताचे तत्त्व समजणे शक्य नाही' असे प्रतिपादणारा, सर्वांत शहाणा असून 'मला काही समजत नाही' असे म्हणणारा; अतिशुद्ध वर्तन करणारा, सन्मार्ग दाखविणारा खरा गुरू असून लोकांचा धर्म व मुलांची नीतिमत्ता बिघडविण्याच्या आरोपावरून मृत्यूची शिक्षा पावलेला; ...शिकत आहे, असे दाखवून शिकविणारा; अधिकारारूढ जबरदस्त पक्षाला, प्रक्षुब्ध अविचारी जनतेला किंवा प्रत्यक्ष मृत्यूलाही न भिणारा; प्रत्यक्ष मरणघटका जवळ आली असता आत्म्याच्या अमरत्वाचे विवेचन करणारा', [१] 'अशा शब्दांत ज्याचे वर्णन केले जाते, तो सॉक्रिटीज - अथीनियन तत्त्ववेत्ता इ. स. पू. ४६९ साली जन्मला व इ. स. पू. ३९९ साली अथीनियन न्यायसभेने दिलेली देहान्त प्रायश्चित्ताची शिक्षा त्याने शांतपणे स्वीकारली.

सॉक्रेटीज याने लिहिलेली अशी एकही ओळ आज उपलब्ध नाही. त्याला लिहिण्यापेक्षा वादविवाद अधिक प्रिय होता. जेथे म्हणून मंडळी असण्याचा संभव आहे, तेथे तो जात असे व लहान, थोर, विद्वान, अविद्वान, गरीब, श्रीमंत माणसांशी

बोलत व वादविवाद करीत असे. प्लेटो या त्याच्या शिष्याने आपल्या गुरूचे संवाद मोठ्या प्रेमाने ग्रथित करून ठेवले आहेत. 'सॉक्रेटीज हा वास्तविक तत्त्ववेत्ता नसून तत्त्वजिज्ञासू होता' असे म्हटले जाते. त्याने अथीनियन लोकांना एखादे तात्त्विक दर्शन दिले नाही, तर त्याने त्यांना विचार करण्याची वृत्ती कशी असावी, हे शिकविले. सॉक्रिटीजचे मुख्य तत्त्व म्हणजे, वाद करताना प्रत्येकाने शब्दांचे लक्षण (व्याख्या) अगोदर स्पष्ट केले पाहिजे, हे होते, व त्यावरच भर देऊन आपल्या प्रतिपक्षास हे लक्षण करावयास लावून, तो त्यांच्या विधानांची अव्याप्ती, अतिव्याप्ती किंवा त्यात दडलेला हेत्वाभास उघड करून दाखवत असे. 'जातिविषयक सामान्य शब्दांच्या व्याख्येची महती व विशेषापासून सामान्यतत्त्व काढण्याची अनुमानपद्धती या दोन गोष्टी सॉक्रिटीजपासून पुढील ग्रीक तत्त्ववेत्ते शिकले' असे ॲरिस्टाटलने म्हटले आहे. [२]

सॉक्रेटीजच्या सर्व संवादांची घडण अशीच आहे. म्हणूनच ज्ञानरूपी अपत्योत्पादनाच्या कामी सॉक्रेटीज स्वतःस विनोदाने सुइणीची उपमा देत असे. ज्ञान हे लोकांना बळजबरीने भरविता येत नाही, तर ते ज्याच्या त्याच्या सत्यजिज्ञासेने पोटात उत्पन्न झाले पाहिजे व खरा गुरू या गर्भित ज्ञानास व्यक्त व स्पष्ट स्वरूप देतो, असा त्याचा भावार्थ होता. त्याच्या मनाचा मोठेपणा व त्याची निरभिमानता हे गुणही ध्यानात ठेवण्यासारखे आहेत. स्वतः मोठा बुद्धिमान व आचरणाने शुद्ध असूनही लोकांच्या मानसिक दौर्बल्याकडे व नैतिक दोषांकडे तो विशेष कडक नजरेने पाहत नसे. तो कधी कधी स्वतः अज्ञ असल्याचे सोंग घेत असे. इतरांच्या स्वभावातील, विचारातील, आचारातील विसंगतता विनोदाने दाखवता दाखवता स्वतः आपलीच चेष्टा करीत असे. तो स्वतः होऊन फार दारू पीत नसे, पण आग्रहाखातर मैफलीत इतरांना हटवीत असे. सॉक्रेटीज म्हणजे आपल्यासारखाच साधा-सामान्य मनुष्य आहे, असे लोकांना वाटत असे. प्रत्येकाने आपली विवेकबुद्धी चालवावी, केवळ जनरूढी, थोरांची वचने, मनोविकार अशा गोष्टींवर विसंबू नये, असे त्याला वाटे. 'त्याने तत्त्वज्ञान स्वर्गातून भूमीवर आणले', असे म्हणतात, ते सार्थ आहे. लोकशिक्षणाच्या त्याच्या या विलक्षण पद्धतीने स्वतः शहाणे समजणाऱ्या अहंमन्य लोकांना राग येई, पण तरुणमंडळी त्याचे भक्त होत असत. भक्त होत, म्हणजे त्याची सगळी मते स्वीकारत, असे नव्हे, तर आपल्याला स्वतःची मते विचारपूर्वक बनवायला याने प्रवृत्त केले, म्हणून कृतज्ञ राहत.





अनुक्रमणिका

त्याच्या अंतिम कसोटीच्या वेळी त्याला तुरुंगातून पळून जायला मदत करून त्याचे प्राण वाचवायला ही शिष्यमंडळी धडपडत होती. पण असे करून अथेन्सच्या कायद्याचा अवमान करायचे त्याने नाकारले. त्यापेक्षा आपण आत्म्याच्या अमरत्वाची चर्चा करून, उरलेला वेळ कारणी लावू, असे त्याने सुचवले; आणि मरणापूर्वी चार घटकांपर्यंत तुरुंगात आत्म्याच्या अमरत्वाविषयी आपल्या शिष्य-मंडळींशी चर्चा केली. ही गोष्ट लोकविलक्षण वाटावी, अशीच आहे.

**'सोफिस्ट' या संवादामधून (ओळी २२९ ए ८ ते २३० बी ९)**

[या संवादाचे शीर्षक 'सोफिस्ट' म्हणून आहे. इ. स. पू. ४५० ते ४०० या काळात ग्रीसमध्ये फिरस्ते व्यावसायिक व्याख्याते असत. त्यांना 'सोफिस्ट' म्हणून ओळखले जात असे. ग्रीसमधील अथेन्ससारख्या नगरराज्यांतून प्रत्येक 'नागरिका'ला आपले म्हणणे स्पष्टपणे आणि प्रभावीपणे मांडण्याची गरज भासे. (स्त्रिया, गुलाम, अल्पवयीन यांना नागरिक समजले जात नसे.) एका परीने ही सोफिस्ट मंडळी ही कला शिकवीत. वादपटुत्व केवळ तत्त्वज्ञानातल्या गहन प्रश्नांच्या बाबतीतच नव्हे, तर नागरिकाला पडणाऱ्या अनेक नैतिक आणि राजकीय प्रश्नांच्या बाबतीतही लावून दाखवत. प्लेटोने त्यांची हीन लोकानुनय करणारे वावदूक म्हणून हेटाळणी केली असली (इंग्लिशमधील 'सोफिस्ट' शब्दाचा अर्थ पाहावा), तरी प्रत्येक विचार पारखून पाहण्याची सवय त्यांनी लोकांना लावली, यात शंका नाही. या संवादातील 'अनोळखी व्यक्ती' म्हणजे सॉक्रिटीज दिसतो, तर थिईटेटस हा सोफिस्टांचा प्रतिनिधी वाटतो.]

अनोळखी माणूस : असं पाहा, अज्ञानाचे वेगवेगळे प्रकार दिसतात. त्यांवर एक योग्य उपाय म्हणून शिक्षणाचा विचार करता येणार नाही का?

थिईटेटस : बरोबर.

अनो. मा. : आणि शिकवण्याच्या कलेबद्दल विचार करायचा झाला, तर शिकवण्याची एकच पद्धत आहे, की अनेक? नाही म्हटलं, तरी दोन प्रमुख पद्धती आहेतच. विचार कर.

थिईटेटस : करतो.

अनो. मा. : मला वाटतं, या प्रश्नाचं उत्तर आपण लवकरच देऊ शकू.

थिईटेटस : ते कसं?

अनो. मा. : जर आपण अज्ञानाचे दोन भाग करू शकलो, तर. अज्ञानाचे दोन भाग असतील, तर शिकविण्याच्याही दोन पद्धती असू शकतात, नाही का?

थिईटेटस : बरं! पण तुला असे दोन भाग दिसतात का?

अनो. मा. : मला वाटतं, अज्ञानाचा एक मोठा वाईट प्रकार आहे; अन् तो प्रकार अज्ञानाचे इतर सर्व प्रकार एकत्र केले, तरी मोठाच ठरेल.

थिईटेटस : तो कोणता?

अनो. मा. : एखादी व्यक्ती असं समजते, की तिला स्वतःला सर्व कळतं; पण प्रत्यक्षात कळत काहीच नसतं. सर्व बौद्धिक चुकांचा उगम बहुधा यातूनच होतो.

थिईटेटस : खरं आहे.

अनो. मा. : आणि मी जर चुकत नसेन, तर या प्रकारच्या अज्ञानाला आपण मूर्खपणा म्हणू शकू.

थिईटेटस होय.

अनो. मा. : मग या प्रकारचं अज्ञान दूर करणाऱ्या शिक्षणाला आपण काय म्हणू शकू?

थिईटेटस : मला वाटतं, तुझ्या मनात जे शिकवणं आहे ते म्हणजे हस्तकलेचं शिक्षण नव्हे, तर आम्हां लोकांच्या उद्योगामुळं जगाच्या या भागात ज्याला खरं शिक्षण असं म्हणतात, ते आहे.

अनो. मा. : होय, थिईटेटस, जवळ जवळ सर्वच ग्रीक लोक यालाच खरं शिक्षण मानतात. पण अजूनही आपण याचा विचार करायचाच आहे, की या शिक्षणाचे काही दोन प्रकार मानता येतात का?

थिईटेटस : होय, आपल्याला तसा विचार करावा लागेल, हे खरं.

अनो. मा. : मला वाटतं, एक जागा आहे, की जिथून आपण विभागणी करू शकतो.

थिईटेटस : ती कोणती जागा?

अनो. मा. : शिक्षणाची एक पद्धत कडक आहे, तर दुसरी सौम्य आहे.

थिईटेटस : या दोन्ही पद्धतींत आपण फरक कसा करायचा?

अनो. मा. : एक पद्धत पूर्वापार चालत आली आहे. आपले वाडवडील त्यांच्या मुलांसाठीही तीं वापरत असत. ती अद्यापही बरेचजण वापरतात. कडक पद्धतीनं

त्यांच्या चुकांबद्दल त्यांची खरडपट्टी काढणं किंवा सौम्यपणे त्यांना सल्ला देणं -- ह प्रकार उपदेश करण्याच्या प्रकारात मोडू शकतात.

थिईटेटस : खरं आहे.

अनो. मा. : पण काहीजण या निष्कर्षापर्यंत आले आहेत, की सर्व अज्ञान अनैच्छिक असतं. त्यामुळं होतं काय, तर जो माणूस स्वतःला हुशार समजतो, तो ज्या गोष्टींत स्वतःला हुशार समजतो, त्या गोष्टी शिकायला तयार नसतो. तसंच, उपदेशपर शिक्षणाचा खटाटोपच जास्त होतो, त्याच्यापासून फायदा काहीच होत नाही.

थिईटेटस : या बाबतीत त्यांचं म्हणणं बरोबर आहे.

अनो. मा. : मग ही मंडळी ही घमेंड उतरवण्यासाठी दुसराच एक मार्ग अवलंबतात.

थिईटेटस : तो कोणता मार्ग ?

अनो. मा. : खरं पाहिलं असता, एखादा माणूस काहीही म्हणत नसताना काहीतरी म्हणतो आहे, असं उगीचच समजतो, तेव्हा त्याच्या शब्दांची फेरतपासणी ते करतात, आणि सहजपणे त्याला त्याच्या मतांमधली अंतर्गत विसंगती दाखवून देतात. वादप्रतिवाद पद्धतीनं हे विसंगत विचार शेजारी शेजारी मांडतात आणि त्याच गोष्टींबद्दल, त्याच बाबतीत ही विधानं उलटसुलट मतं मांडत आहेत, हे त्याच्या पदरात घालतात.

**'गॉजिअस' या संवादामधून (ओळी ५१० ए ८ ते ५१३ ई ४)**

[ 'सोफिस्ट' मधल्या उताऱ्यात सॉक्रेटीजच्या लोकशिक्षणाच्या पद्धतीचे रहस्य सांगितले आहे. 'गॉजिअस' मधल्या या पुढच्या उताऱ्यात नाटककार इप्सन ज्याला 'गणशत्रू' म्हणतो, (ॲन एनिमी ऑफ द पीपल) त्या प्रवाहाविरुद्ध पोहणाऱ्या आणि परिपूर्णतेचा ध्यास घेणाऱ्या भल्या माणसाचे चित्र सॉक्रेटीजने रेखाटले आहे. कॅलिक्लीज या स्वतःच्या वादकुशलतेवर खूश असणाऱ्या माणसाशी तो या प्रसंगी बोलतो आहे.]

सॉक्रेटीज : आपल्यावर कोणताच अन्याय होणार नाही किंवा झालाच, तर अगदीच थोडा होईल, अशी तरतूद करता येईल, असं तुला वाटतं का? माझं या बाबतीत काही एक म्हणणं आहे, ते तुला पटतं का, बघ. एक तर तुम्ही तुमच्या

नगरात सर्व सत्ताधारी असलं पाहिजे, अगदी हुकुमशहा तरी असलं पाहिजे, किंवा सत्ताधारी सरकारचे पक्षपाती असलं पाहिजे.

कॅलिक्लीज : सॉक्रिटीज, असं पाहा, की जर तू योग्य बोललास, तर मी तुझी स्तुती करायला मागंपुढं पाहणार नाही; आणि आता मला वाटतं, की तू खरोखरीच मार्मिक बोलत आहेस.

सॉक्रिटीज : छान, मग मी या नंतरच्या मुद्द्याविषयी देखील बरोबर आहे का, याचा तू विचार कर. माझा विश्वास आहे, की प्राचीन ऋषींनी सांगितल्याप्रमाणे घनिष्ठ मैत्री सारख्या स्वभावाच्या व्यक्तींमध्ये होते. हे तुला मान्य आहे ना?

कॅलिक्लीज : हो, हे पटतं.

सॉक्रटीज : आता जिथं हुकुमशहा सत्तेवर असून, तो रासवट अन् अशिक्षित असेल, तर त्या नगरात त्याच्यापेक्षा खूपच वरचढ दुसरा कोणी असेल, तर तो हुकुमशहा त्याला घाबरून असेल आणि अशी व्यक्ती त्या हुकुमशहाचा कधीही खरा मित्र असणार नाही किंवा होऊ शकणार नाही.

कॅलिक्लीज : हे खरं आहे.

सॉक्रिटीज : जो कोणी त्या हुकुमशहापेक्षा खालच्या योग्यतेचा असेल, त्याचा तो हुकुमशहा तिरस्कार करील आणि त्यांच्याशी मैत्री करावी, असं त्याला कधीच वाटणार नाही.

कॅलिक्लीज : हेही खरं आहे.

सॉक्रिटीज : राहता राहिली अशी कुणी व्यक्ती, की जी अशा माणसाची मित्र होऊ शकते. ती व्यक्ती सारख्या स्वभावाची, सारख्या आवडी असणारी, आणि सत्ताधाऱ्याच्या अगदी अधीन राहायला, त्याचा शब्द झेलायला तयार असणारी आहे. अशा व्यक्तीचं त्या राज्यात बरंच प्रस्थ राहील, त्याचं कुणी वाकडं करू शकणार नाही. खरं, की नाही?

कॅलिक्लीज : होय.

सॉक्रिटीज : लक्षात घे, की त्या नगरातील तरुण मंडळीपैकी कुणी मोठी सत्ता मिळविण्याचा विचार करू शकणार नाही. ज्याचा तसा विचार असेल, त्याने लहानपणापासून आपल्या वरिष्ठाला प्रिय आणि अप्रिय असणाऱ्या गोष्टीच स्वतःला प्रिय आणि अप्रिय करून घ्यायला पाहिजेत. किंबहुना आपल्या वरिष्ठाप्रमाणे बनण्याचा





अनुक्रमणिका

प्रयत्न केला पाहिजे, असं नाही का?

कॅलिक्लीज : होय.

सॉक्रेटीज : आता तुझ्या सिद्धांताप्रमाणे अशा व्यक्तीवर कुणीच अन्याय करू शकणार नाही; उलट, त्या नगरामध्ये ती मोठी सत्ता तो बाळगून राहील.

कॅलिक्लीज : निश्चितच.

सॉक्रेटीज : आणि शिवाय तोही कुणाचंच वाकडं करणार नाही. किंवा यापेक्षा अगदी वेगळंच होईल? आता तो जर त्याच्या दुष्ट मालकासारखाच होणार असेल आणि त्याचं त्याच्यापाशी मोठं वजन राहणार असेल, तर हे कसं होणार? उलट, मला तर वाटतं, की तो या तयारीत राहील, की आपण कितीही खोटं करू शकू आणि या गुन्ह्यातून सहीसलामत सुटुन जाऊ. राहील, की नाही?

कॅलिक्लीज : उघडच राहील.

सॉक्रेटीज : तो अधिकात अधिक अधःपतनाचा धनी होईल. त्याचा आत्मा नीतिभ्रष्ट होईल. त्याच्या मालकाची नक्कल केल्यामुळं आणि त्यानं भोगलेल्या सत्तेमुळं त्याचा सत्यानाश होईल.

कॅलिक्लीज : सॉक्रेटीज, तू कसंही करून ह्या किंवा त्या मार्गानं आमची विधानं कशीही वळवतोस. तुझ्या हे लक्षात येत नाही का, की हा जुलमी सत्ताधीशाची नक्कल करणारा त्याच्याच पद्धतीनं वागायला नकार देणाऱ्याला मृत्युदंड देईल किंवा त्याची मालमत्ता जप्त करील?

सॉक्रेटीज : मी जर बहिरा नसेन, तर मी तुझ्याकडून आणि पोलसकडून अलीकडे हे बऱ्याच वेळा ऐकलं आहे, पण मी तुला सांगतो, त्यानं जर दुसऱ्याला मारलं, तर ते एका भल्या माणसाला एका दुष्ट माणसानं मारणं ठरेल.

कॅलीक्लीज : नेमका याच तर गोष्टीचा आपल्याला संताप येतो, नाही का?

सॉक्रेटीज : खरं म्हणजे, तुझ्यासारख्या सुज्ञपणे विचार करणाऱ्या माणसाला का बरं राग यावा? माणसानं जितकं जास्त जगता येईल, तितकं जगण्याचा कसून प्रयत्न करावा; अन् त्यासाठी आपल्याला धोक्यापासून वाचवणाऱ्या कलांचा उपयोग करून घ्यावा, असंच तुझं म्हणणं असतं ना? त्यासाठीच तर तू मला पटवत असतोस ना, की न्यायालयात आपला जीव वाचवणारी वक्तृत्वकला मी राबवावी, म्हणून!

कॉलिक्लीज : होय तर, अगदी सुयोग्य सल्ला होता तो!

सॉक्रेटीज : असं कसं म्हणतोस, मित्रा? पोहण्याची कला म्हणजे अगदी अद्‌भुतच, असं का तुझं मत आहे?

कॅलिक्लीज : छे छे, असं माझं कशाला मत असेल?

सॉक्रेटीज (मुळातले या ठिकाणचे दीर्घ भाषण थोड्या संक्षेपाने दिले आहे.) म्हणजे हा खासा न्याय झाला! म्हणजे पोहण्याच्या कलेला फारशी प्रतिष्ठा नाही. त्याहून मोठ्या आणि अनेकांचे जीव, मुलंबाळं, मालमत्ता वाचवणाऱ्या नावेचं सुकाणू धरणाऱ्या तांडेलाला फारशी प्रतिष्ठा नाही. पण न्यायालयात वकीलपत्र घेऊन वक्तृत्व पाजळणाऱ्या माणसाची मात्र खूपच प्रतिष्ठा! खरं म्हणजे, तांडेलाची प्रतिष्ठा बेताची असते, ते योग्यच नाही का? अखेर त्यानं जलसमाधीपासून वाचवलेल्या जीवांच्या दृष्टीनं पाहा बरं. असा जीव वाचवलेला माणूस असंही म्हणू शकेल — कशाला वाचवलं मला? असाध्य दुखण्यांच्यामुळं अगदी नकोसा झालेला माझा जीव? वाचवलेला जीव शारीरिक दृष्टीनं किंवा आत्मिक दृष्टीनं कोणत्या अवस्थेत आहे, याचं भान जीव वाचवणारी मंडळी ठेवू शकत नाहीत — मग ती तांडेल मंडळी असोत, घर बांधणारी एंजीनियर मंडळी असोत, आजार बरा करणारी डॉक्टर मंडळी असोत, आणि हो, न्यायालयातून निभावून नेणारी तुझ्यासारखी वकील मंडळी असोत. तुम्हां वकील मंडळींची काही खास प्रतिष्ठा कशासाठी? माणूस भल्या अवस्थेत जगतो का, याला अधिक महत्त्व आहे. नुसतं जगणं, मालमत्ता बाळगून असणं, प्रतिष्ठित कुटुंबात जन्माला येणं या सगळ्या दुय्यम गोष्टी आहेत. खऱ्या माणसानं या दुय्यम गोष्टींबद्दल किती फिकीर करायची, हा प्रश्नच आहे. अशा गोष्टी देवाच्या भरवशावर सोडून द्याव्या, अगदी बायका माणसं म्हणतात, त्याप्रमाणे नियती कुणाला चुकत नाही, असं धरून चालावं, हेच ठीक. खरा प्रश्न वेगळाच आहे. आपल्या वाट्याला आलेलं आयुष्य भलेपणानं जगायचं, तर आपण जिथं राहतो, तिथलं शासन कुणाच्या हातांत आहे, त्याच्या तंत्रानं चालावं. उदाहरणार्थ, अथेन्समधलं शासन नागरिकांच्या हातांत आहे म्हणून त्यांच्या चालीनं आणि कलानं जगावं, अन् या धोरणामुळं राज्यात सत्तेचा वाटेकरी व्हावं, हेच करायचं का, हा तो प्रश्न आहे. कॅलिक्लीज, सत्तेमध्ये वाटा मिळायचा, तर सत्ताधाऱ्यांच्या तालावरच चालावं लागतं, दुसऱ्या कोणत्या वाटेनं सत्ता मिळण्याची काही जादू आहे, अशा भ्रमात तू राहू नकोस. तुझी वक्तृत्वकला परिणामकारक खरी, पण ती केव्हा? ज्यांच्यावर तू या कलेचा मारा करणार, त्यांच्या

स्वभावाला जुळेल, रुचेल, असं तुला काही सांगता आलं, तरच, त्यांच्या स्वभावाशी जुळता असा आपला स्वभाव बनून गेला, तरच. तर, बेट्या, याच्यावर तुझं काय म्हणणं आहे?

कॅलिक्लीज : म्हणणं काय असणार? कसं, कुणाला ठाऊक, तुझं म्हणणं योग्य वाटतं; पण हेही खरं, की पुष्कळांना तुझं म्हणणं पटत नाही, तसं मलाही अगदी पूर्णपणे पटत नाही, सॉक्रेटीज.

सॉक्रेटीज : न पटणं साहजिक आहे, कॅलिक्लीज, तुझ्या आत्म्याच्या आतल्या गाभ्यात लोक लोक म्हणून म्हणतात, त्यांच्याबद्दल कुठंतरी आत्मीयता आहे, आणि तीच माझं म्हणणं योग्य वाटून सुद्धा ते पटण्याच्या आड येते आहे. पण कदाचित आपण या सगळ्या प्रश्नांचा अधिक खोलवर शोध घेतला, तर कदाचित हे चित्र पालटेल. सध्या निदान एवढं तरी लक्षात घे, की आपलं शरीर आणि आपला आत्मा यांची निगराणी करायची, तर ती दोन अगदी भिन्न पद्धतींनी माणसं करू पाहतात. आपण मागे एकदा पाहिलं होतं, की एका पद्धतीत माणूस जे प्रिय असेल, सुखद वाटेल, त्याच्या मागे लागतो; अन् दुसऱ्या पद्धतीत माणूस प्रेमाची कास धरत नाही, प्रसंगी त्याच्याविरुद्ध झगडतो, आठवतं का?

कॅलिक्लीज : आठवतं तर.

सॉक्रेटीज : आता केवळ सुखाच्या मागं लागणं हे काही खरं नाही, तो केवळ तोंडपुजेपणा झाला.

कॅलिक्लीज असेल, असेल, तुझं तसं म्हणणंच आहे, तर.

सॉक्रेटीज : उलट, दुसरा मार्ग म्हणजे शरीराची किंवा आत्म्याची निगराणी करताना परिपूर्णतेचा ध्यास घेणं.

कॅलिक्लीज : होय.

(ग्रीकमधील psyche शब्दाच्या अर्थात आत्मा आणि चित्त हे दोन्ही अर्थ एकत्र झाले आहेत, हे लक्षात घ्यावे.)

**'क्रिटो' या संवादामधून (ओळी ४६ डी ९ ते ५० सी ३)**

[या संवादामध्ये सॉक्रेटीजच्या क्रिटो नावाच्या एका वयस्क व श्रीमंत मित्राने त्याच्या देहान्तशिक्षेच्या आदल्या दिवशी त्याची तुरुंगातून सुटका करण्याचा प्रयत्न

केला असता, त्या वेळी सॉक्रेटीजने त्याच्याबरोबर घातलेला वाद आलेला आहे.]

सॉक्रेटीज : 'लोकांची काही मतं विचारार्ह असतात, तर याच्या उलट लोकांची काही मतं विचारार्ह नसतात', असा विचार खोलवर जाऊन विचार करणाऱ्यांनी मांडला आहे, अशी माझी समजूत आहे, अन् याच सिद्धांताविषयी आपण आतापर्यंत बोलत होतो. क्रिटो, हे तत्व तुला सयुक्तिक वाटत नाही का? मी ज्या स्थितीत आता आहे, त्या स्थितीत माझी आत्मवंचना होणं शक्य आहे, पण तुझी स्थिती निराळी आहे. तुझा मरणकाळ माझ्यासारखा उद्यावर येऊन ठेपलेला नाही; आणि तशी अजिबात शक्यताही नाही. त्यामुळं तुझ्या मतांवर अशा संकटाचं सावट पडणार नाही. तेव्हा तुला या प्रश्नासंबंधी तटस्थ वृत्तीनं विचार करता येईल. विचार कर, हे तुला पुरेसं सयुक्तिक तत्त्व वाटत नाही का? लोकांची सर्वच मतं मान्य होण्याजोगी नसतात, तर काही मतं तशी असतात, तर काही तशी नसतात. बरोबर आहे, की नाही?

क्रिटो : होय, बरोबरच आहे.

सॉक्रेटीज : दुसऱ्या शब्दांत सांगायचं, तर योग्य मतांचा आदर करावा; पण अयोग्य मतांचा करू नये.

क्रिटो : होय.

सॉक्रेटीज : म्हणजे शहाण्या लोकांची मते योग्य असतात आणि मूर्खांची वाईट असतात, खरं ना?

क्रिटो : अर्थातच.

सॉक्रेटीज : बरं, आता थोडं पुढं सरकून मी मागे वापरत असे, त्या एका दृष्टांताचा तू विचार कर. जेव्हा कुणी अगदी मनःपूर्वक कसलंही प्रशिक्षण घेत असेल, तेव्हा तो, होईल त्या निंदास्तुतीची, येईल त्या मतांची कदर करत बसतो, की फक्त जाणत्या माणसाच्या प्रत्यक्ष प्रशिक्षण देणाऱ्याच्या किंवा उपचार करणाऱ्याच्या अभिप्रायाला मान देतो.

क्रिटो : जाणत्या लोकांकडून व्यक्त होणाऱ्या मतांकडेच लक्ष दिलं पाहिजे.

सॉक्रेटिज : म्हणजे त्यानं फक्त तज्ज्ञ व्यक्तीच्या टीकेलाच मान तुकवली पाहिजे. अन् तिच्या स्तुतीमुळं आनंदून जायला पाहिजे आणि जनतेकडून होणाऱ्या टीकेला किंवा स्तुतीला नव्हे, असंच ना?

क्रिटो : अर्थातच.





अनुक्रमणिका

सॉक्रिटीज : म्हणजे विशेषज्ञ अशा प्रशिक्षकाच्या मताप्रमाणेच त्यानं आपला आहार, विहार, खाणं-पिणं ठरविलं पाहिजे, सामान्य लोकांच्या मताप्रमाणे नव्हे.

क्रिटो : होय, तसंच.

सॉक्रिटीज : ठीक तर मग. समजा, की आपल्या त्या तज्ज्ञ शिक्षकाचं मत किंवा त्याची पसंती-नापसंती यांचा अनादर करून, ज्यांना काही विशेष कळत नाही, अशा इतर मंडळींच्या मताप्रमाणे तो जर वागू लागला, तर निश्चितच त्याचं काही भलं होणार नाही.

क्रिटो : निश्चितच.

सॉक्रिटीज : आपल्या शिक्षकाची अवज्ञा करणाऱ्या या माणसाचं जे अहित होईल, ते कोणत्या प्रकारचं असेल? म्हणजे अपाय कशाला होईल?

क्रिटो : अर्थात शारीरिक अपाय होईल, म्हणजेच त्याच्या शरीराला काय तो त्रास सहन करावा लागेल.

सॉक्रिटीज : उत्तम. क्रिटो, मग आता मला सांग; दुसऱ्याही गोष्टींविषयी असंच म्हणता येणार नाही का? एक सार्वत्रिक नियम आपण बांधला, तर कसं? आपल्याला काही सर्व तपशिलाचा सुटा विचार करायचा नाही. पण आपण सध्या ज्या विषयांचा विचार करीत आहोत, त्यांविषयी म्हणजेच न्यायी-अन्यायी, अब्रूदार-हलकट, योग्य-अयोग्य अशा सर्व कृतींना ते लागू पडतं का? अशा गोष्टींत ज्या कुणाला खरोखरी कळतं, असं आपण गृहीत धरू शकू, त्याचं मार्गदर्शन घ्यावयाचं, की पुष्कळांचं ऐकत बसायचं, त्यांच्या धाकात राहायचं? तुला काय वाटतं? इतर सर्वजणांपेक्षा ज्ञानी हा जरी एकटाच असला, तरी त्याचा आदर राखायचा, त्याला वचकून राहायचं? तुला काय वाटतं? जर आपण त्या ज्ञानी माणसाच्या सल्ल्याप्रमाणे वागलो नाही, तर आपला जो भाग सद्‌वर्तनामुळं सुधारतो आणि दुर्वर्तनामुळं हानी पावतो, की नाही? हा सर्वच मूर्खपणा आहे, असं तुला वाटतं?

क्रिटो : सॉक्रिटीज, मला वाटतं, हे बरोबर आहे, मूर्खपणाचं नाही.

सॉक्रिटीज : मग पुढील टप्प्याचा विचार कर. आपल्या सर्वांमध्ये असं काही अंग आहे, की जे आरोग्यदायी कृतींमुळं सुधारतं आणि रोगट कृतींमुळं बिघडतं. भले त्यांच्या नादी लागून आपल्या या अंगाची हानी झाली, तर जगणं सार्थ होईल का? काही अंग म्हणजे इथं आपलं शरीर, असं मला म्हणायचं आहे.

क्रिटो : होय.

सॉक्रेटीज : बरं, अशी ढासळलेली तब्येत अन जीर्ण झालेलं शरीर घेऊन आयुष्य जगण्यायोग्य राहील का?

क्रिटो : निश्चितच नाही.

सॉक्रेटीज : अयोग्य कृतींमुळं अपंग होणाऱ्या नि योग्य कृतींमुळं सुदृढ होणाऱ्या आपल्या त्या दुसऱ्या भागाबद्दल काय? या नष्ट पावलेल्या भागासह आयुष्य जगण्यायोग्य राहील का? का ज्यात चांगलं वाईट ठरत असतं, असा हा भाग आपल्या शरीरापेक्षा कमी महत्त्वाचा आहे, अशी तर आपली समजूत नाही?

क्रिटो : मुळीच नाही.

सॉक्रेटीज : खरोखरच तो अधिक मोलाचा भाग आहे ना?

क्रिटो : खूपच अधिक.

सॉक्रेटीज : तसं असेल, तर मग, मित्रा, लोक काय म्हणतील, याचा विचार न करता, प्रत्यक्ष सत्याचं प्रतिनिधित्व करणारी अधिकारी व्यक्ती म्हणून तज्ज्ञ व्यक्तीचा विचार आपण मानला पाहिजे. योग्य, नेकीचं, किंवा चांगलं काय, याचा फैसला करताना लोकमताची पर्वा आपण केली पाहिजे, हे जे तुझं विधान आहे, ते बरोबर नाही. अर्थात यावर आक्षेप घेता येतो, की, काही झालं, तरी बहुजनसमाजाची शक्ती मोठी आहे, तो आपल्या जिवावर उठू शकतो.

क्रिटो : वादच नको याबद्दल, सॉक्रेटीज. तसा आक्षेप अवश्य घेता येईल.

सॉक्रेटीज कबूल, पण मला वाटतं, या आक्षेपानं आपल्या पूर्वीच्या युक्तिवादाचा मुळीच धक्का बसत नाही. तरीही जगणं ही महत्त्वाची गोष्ट नसून, मातब्बरी आहे, ती चांगलं जगण्याची. या मुद्द्याबाबत आपलं समाधान झालं, की नाही, याचा तू विचार करावास, असं मला वाटतं.

क्रिटो : का बरं विचार करायचा? तो सिद्धांत बरोबरच आहे.

सॉक्रेटीज : आणि चांगलं जगणं म्हणजे सचोटीनं आणि योग्य तऱ्हेनं जगणं होय.

क्रिटो : बरोबर.

सॉक्रेटीज या सिद्धांतावर जर एकमत असेल, तर आपण पुढं जाऊ.

अथेन्सच्या लोकांच्या संमतीशिवाय या तुरुंगातून पळून जाण्याचा प्रयत्न मी करावा, की नाही, हा आपल्यापुढचा प्रश्न आहे. आपल्या सिद्धांतावरून असा प्रयत्न करावा, हे अनुमान जर स्पष्टपणे निघालं, तर मी तसा प्रयत्न करीन, परंतु असं जर अनुमान निघत नसेल, तर तो विचार, आपण सोडून देऊ. घनहानी, अपकीर्ती, मुलांना शिक्षण देण्याविषयीचं कर्तव्य, इत्यादी गोष्टींविषयी तुम्ही जे बोललात, ते सामान्य जनतेच्या मताला धरून होतं, खरं; पण सामान्य जनतेचं काय आहे. लोक पाहिजे ते म्हणतील आणि करतील, विचार आणि तर्क यांचा तिथं काहीच संबंध नसतो. जनता माणसाचा जीव घेईल आणि जिवे मारल्यावर सजीव करण्याची शक्ती जर जवळ असती, तर तेवढ्याच उत्साहानं जीव परतही देईल. परंतु आपला युक्तिवाद ज्या अर्थी पूर्वीच्या सिद्धांतापर्यंत येऊन ठेपला आहे, त्या अर्थी आपल्याला विचार करण्याकरता प्रश्न एवढाच आहे, की - येथून मी निसटून गेलो किंवा निसटून जाण्याबद्दल लोकांना खटपट करू दिली किंवा त्यांना या मदतीबद्दल पैसे दिले आणि त्या लोकांचे त्यासाठी आभार मानले, तर आपण हे सर्व चांगलं केल्यासारखं होईल, की वाईट? आणि एकदा का जर 'वाईट' असं ठरलं, तर मग इथंच पाय रोवून राहण्यामुळं जे काही संकट ओढवेल, ते मुळीच विचारात घेऊ नये, मग ते संकट प्रत्यक्ष मरण असो वा दुसरं काही असो, त्याचा विचार करू नये. अयोग्य कृती करण्याचा धोका हा जास्त गंभीर धोका आहे.

क्रिटो : तुझं म्हणणं बरोबर आहे, सॉक्रेटीज. पण आपण नेमकं काय करायचं, त्याचा आता विचार करायला नको का?

सॉक्रेटीज : आपण दोघे मिळून साधकबाधक सर्व गोष्टींचा विचार करू या. तुम्हांला, माझं म्हणणं जिथं खोटं वाटेल, तिथं तुम्ही मला अडवा आणि माझी चूक दाखवून माझी खात्री करून द्या; आणि जर माझं म्हणणं तुम्हांला खोडून काढता आलं नाही, तर मात्र 'अथेन्सच्या लोकांच्या इच्छेविरुद्ध येथून मी पळून जावे', असं माझ्याजवळ एकसारखं जे टुमणं लावता आहात, ते सोडून द्या. तुमच्या म्हणण्याची कदर करावी आणि शक्य असेल, तर ते मान्यही करावं, अशी माझी फार इच्छा आहे; मला जे करायचं आहे, त्याला तुमची संमती मिळावी. तुमच्या मताविरुद्ध वागावं, असं मला वाटत नाही. मी पहिल्याप्रथम जे म्हणत होतो, त्याचाच आता पुन्हा विचार करू या. मी म्हणतो, त्यात काही चूक दिसत असली, तर सांगायला

कमी करू नका.

क्रिटो : ठीक आहे, प्रयत्न तर करतो.

सॉक्रेटीज : हेतुपुरस्सर केव्हाही अयोग्य कृती करू नये, असं आपण मानायचं, की ते परिस्थितीवर अवलंबून ठेवायचं? आपलं तर पूर्वीच एकमत झालेलं नाही का, की दुष्कृत्य हे दुष्कृत्यच, ते कधी उचित किंवा वंद्य ठरत नाही. आपली पूर्वीपासूनची आग्रही मतं या अखेरच्या थोड्या दिवसांत झुगारून द्यायची, की काय? क्रिटो, आपलं दोघांचं वय काय वर्षानुवर्ष गंभीर चर्चा करून शेवटी आपण पोरंच ठरणार. म्हणायचं? जे आजवर आपल्याला पटत आलं, तेच तर खरं नाही का? जनमत काही असो. स्वीकृत मताला असलेला पर्याय सुखाचा असो, की खडतर असो, दुष्कृत्य निश्‍चितच अनुचित आणि निंद्यच ठरणार नाही ते करणारासाठी? हेच तर आपलं मत नाही का?

क्रिटो : हो, हेच आपलं मत आहे.

सॉक्रेटीज : याचा अर्थ असा, की आपण कोणत्याही स्थितीत अयोग्य कृती करता कामा नये.

क्रिटो : बरोबरच आहे.

सॉक्रेटीज : त्याचप्रमाणे कुणी आपल्यावर अन्याय केला, तरी आपण अन्याय करणं समर्थनीय ठरणार नाही. लोक ते समर्थनीय मानतात, हा भाग निराळा.

क्रिटो : असं वाटतं खरं.

सॉक्रेटीज : बरं, क्रिटो, पुन्हा एकदा सांग, कोणाचंही झालं, तरी अकल्याण करावं का?

क्रिटो : मुळीच करू नये.

सॉक्रेटीज : आणि अपकाराची फेड अपकारानंच करावी, हा जो सामान्य लोकांचा न्याय आहे, तो न्यायाचा आहे, की अन्यायाचा?

क्रिटो : अन्यायाचा.

सॉक्रेटीज कारण कुणावर अपकार करणं म्हणजे त्याच्यावर अन्याय करण्यासारखंच आहे.

क्रिटो : अगदी बरोबर आहे.

सॉक्रेटीज : याचा अर्थ असा, की कोणी काहीही अपकार केला, तरी त्याचा

सूड उगवण्याची किंवा त्याच्याशी., 'जशास तसे' या न्यायानं वागण्याची आपण कधीही इच्छा धरू नये. पण हे मत बहुजनसमाजाला कधीही मान्य झालं नव्हतं; व पुढं केव्हा होईल, असं वाटतही नाही. तेव्हा, क्रिटो, हे तत्त्व मान्य करण्यापूर्वी आपण काय म्हणत आहो, याचा पुन्हा एकदा कसून विचार करून पाहा. एकेक सुटी गोष्ट कबूल करता करता आपण भलतंच काही मनाविरुद्ध कबूल करून बसू, असं तुम्हांला वाटायला नको. हे तत्त्व मान्य करणारे आणि न करणारे हे दोन अगदी भिन्न पंथांचे लोक आहेत. त्या दोघांना सामान्य असलेली अशी भूमिकाच नसल्यामुळं एकमेकांमधील अंतर एकमेकांच्या पूर्णपणे लक्षात आलं, म्हणजे तिरस्कार करण्याखेरीज त्यांना गत्यंतरच नसतं. तेव्हा दुसऱ्याचं अकल्याण करणं किंवा सूड उगवणं किंवा अपकाराची फेड अपकारानंच करणं हे कधीही योग्य नव्हे. हे मूलभूत तत्त्व माझ्याप्रमाणेच तुम्हांलाही मान्य आहे किंवा नाही, हे आधी सांगा. हे तत्त्व मान्य आहे, हे गृहीत धरून काय अनुमान निघतं, ते पाहायचं का? तुम्हांला हे तत्त्व मान्य नसेल, तर तसं सांगा, माझं मात्र हे असं मत पूर्वी होतं आणि अद्यापही आहे. तुमचा मतभेद असला, तर तुमचं काय म्हणणं आहे, हे मला ऐकू द्या. पण मतभेद नसेल आणि तुमचं पूर्वीचं मत अजून कायम असेल, तर युक्तिवादाच्या मार्गानं आणखी एक पाऊल पुढं जाऊ या.

क्रिटो : चला, जाऊ या, माझं मत अजून कायम आहे.

सॉक्रेटीज : माझं म्हणणं मी प्रश्नाच्या रूपानंच सांगतो. प्रश्न असा आहे, की केलेला करार, आपण, अर्थात तो उचित असला, तर पाळावा, की खुशाल मोडावा?

क्रिटो : अर्थातच पाळावा.

सॉक्रेटीज : हे तत्त्व खरं आहे. तर ते आपल्या वादात कसं लागू पडतं, ते पाहू. या अथेन्सच्या लोकांना मला सोडून देण्याबद्दल पटवून न देताच आपण तसेच इथून पळून गेलो, तर आपण अपकार केल्यासारखं नाही का ठरणार? आणि तोही जिथं तो करायला अगदी नको, तिथंच. आपण जे न्याय्य करार केले आहेत, ते आपण पाळले, असं होईल का मग?

क्रिटो : मी कसं तुझ्या प्रश्नाचं उत्तर देऊ? सॉक्रेटीज, मला काही कळेनासं झालंय्.

सॉक्रेटीज : असं बघ - समजा, आपण इथून पळून जायची तयारी करत

आहोत, आता याला पळून जाणं म्हणायचं, का दुसरं काही. . . पण ते जाऊ दे, इतक्यात अथेन्स राज्याचे कायदेकानू, घटना साक्षात इथं येऊन उभी ठाकली अन् आपल्याला विचारू लागली. समजा - अरे सॉक्रेटीज, हे तू काय आरंभलंय्स? तू हे जे काही कृत्य करू पाहतोस, ते करून तू आमचाच घात नाही का करतोय्स तुझ्यानं होईल तेवढा? आमचाच नव्हे, तर सगळ्या राज्ययंत्रणेचा घात? कायद्याचे सांगितलेले निवाडे जर अमलात आले नाहीत, व्यक्तिगत पातळीवर ठोकरले गेले, नष्ट झाले, तर हे नगरराज्य एक क्षणभर तरी टिकेल का? त्याची उलथापालथ नाही का होणार?

क्रिटो, आपण या आणि अशा प्रश्नांची काय उत्तरं देणार आहोत? सांग मला. एकदा दिलेला निवाडा बंधनकारक राहील, असा जो कायदा आहे, त्याला रद्द का करायचा आहे? असा रद्द का करू नये, याबद्दल खूप सांगण्यासारखं आहे. एखादा व्यावसायिक वकील ते सांगू शकेल. आपण असं का उत्तर देणार आहोत, की - हो, बाबा, आम्ही तुमचा नाश करायला निघालो आहोत, कारण माझ्याविरुद्धच्या खटल्यात राज्यानं माझ्यावर अन्याय करणारा चुकीचा निवाडा दिला आहे. बोल, असं आपण उत्तर देणार आहोत?

क्रिटो : आता एवढ्यात तू जे काही चुकीच्या निवाड्याबद्दल बोललास, तसंच काही, सॉक्रेटीज, तसंच.

सॉक्रेटीज : आणि मग कायदेकानू यावर असं काही म्हणाले, तर? असं काही कलम नव्हतं, सॉक्रेटीज, तुझ्यात नि आमच्यांत जो करार झाला आहे, त्याच्यामध्ये होतं काही? राज्य जे काही निवाडे देईल, त्याला अनुसरण्याची नागरिक म्हणून तुझी प्रतिज्ञा नव्हती का?

**संदर्भ**


(१) वा. म. जोशी, सॉक्रेटिसाचे संवाद, कर्नाटक प्रिंटिंग वर्क्स, धारवाड, १९२२ : पृ. १

(२) जोशी, १९२२ : पृ. २९



**१, शीतल अपार्टमेंट, ४६/४, एरंडवन, पुणे ४११ ००४**

# लोकशिक्षणाचे राजमार्ग, आडमार्ग आणि वाममार्ग

आशा मुंडले

प्रत्येक एकसंध गट आपापल्या शिक्षणाची काही ना काही व्यवस्था करतच असतो. किंबहुना प्राणी आणि पक्षी हे देखील आपल्या लहानग्यांना शिकवताना आढळून येतात. माणूस हा भाषा आणि संस्कृती असलेला प्राणी. म्हणून चालायला शिकविणे, भक्ष्य मिळवायला शिकवणे यांसारख्या क्रियांतही संस्कृतिभिन्नता आहे. 'भूक लागली, तर आईकडे माग. हातानं घेऊन खाऊ नको हावरटासारखा' हे वाक्य पाहा. नैसर्गिक प्रेरणेच्या विरुद्ध असे हे शिक्षण बऱ्याच कुटुंबांत समाजमान्य आहे.

मुलींनी 'जपून' चालावे. रस्त्याने जाताना बागडत चालू नये आणि चालतानाही मुलग्यांनी स्वच्छंदपणे, शीळ घालत, उड्या मारत, ढकलाढकली करत गेले, तर ते गैर नाही, असे 'शिक्षण' आहे, हे शाळेत चालत जाणारी मुलेमुली पाहून लक्षात येते.

शिक्षण देताना प्रधान हेतू 'आहे हेच चालू राहून, तसे नव्या पिढीने वागावे', हाच असतो, आणि 'जैसे थे' च्या पेक्षा वेगळ्या वागणुकीला शिक्षा किंवा नाराजीचीही तरतूद असते. कारण शिक्षण हे मुख्यतः संक्रमण आणि सातत्य यांसाठीच आहे. संक्रमण नवीन पिढीकडे किंवा इतर मानवसमूहाकडे असू शकते. उदाहरणार्थ, अमेरिकन जीवनपद्धतीचा जगभर प्रचार.

परंतु 'बदल' हाही मानवी संस्कृतीचाच अटळ भाग असल्याने अगदी सनातनी समाजातही शिक्षणामधे 'बदल' यालाही औपचारिक वाव ठेवलेला आढळतो. उदाहरणार्थ, पूर्वीच्या भारतीय तत्त्वज्ञानात अरण्यात जाऊन ऋषी आपापली स्वतंत्र उपनिषदे निर्माण करीत, त्यामुळे त्या काळी प्रचलित मतांचे खंडनही होऊ शकत होते. परंतु 'बदल' हा राजकीय आणि आर्थिक सत्ताधाऱ्यांना अनुकूल असा राहावा, त्यांच्या हितसंबंधांना बाधा येऊ नये, इतपत प्रमाणातच ग्राह्य राहतो. त्याबाहेर 'बदल' गेल्यास ते 'बंड' ठरते आणि मग मात्र जुना का नवा विचार टिकायचा, या प्रश्नाचा निकाल साम, दाम, दंड, भेद या राजकीय प्रक्रियेतून होतो.

राजेशाहीकडून लोकशाहीकडे वाटचाल हा इतिहास वेगवेगळ्या समाजांत कसा

आला, हे पाहिले, तर मी काय म्हणते, हे समजेल.

'श्रेष्ठ विचारच शेवटी जिंकतो', 'सत्यच जिंकणार' ही प्रचारकी बोधवाक्ये आहेत. तो जगाचा घटनात्मक नियम नाही. अन्यथा हिटलरचा उदय झालाच नसता. दक्षिण आफ्रिकाही अशी दिसली नसती.

बदलाचा मान्य वेगसुद्धा सर्व समाजांत सारखा नाही. परंपरागत समाजात मंदगती मान्य आहे, तर अमेरिकेसारख्या 'नवे ते हवे' म्हणणाऱ्या समाजात 'बदलासाठी बदल' सुद्धा स्वीकारला जातो, घडवलाही जातो. अर्थसत्तेचे बदलांवर पुष्कळ नियंत्रण आहे.

भारत नेहमीप्रमाणे याही क्षेत्रात त्रिशंकू आहे. लोकशिक्षण करून आधुनिक लोकशाही, खुली अर्थव्यवस्था, जातिभेदनिर्मूलन वगैरे सगळं आम्हांला आणायचंय्. पण असलेल्या नोकऱ्या, वरिष्ठांची चैन, संपत्ती हडप करण्याचे बेकायदेशीर मार्ग हे पण आम्हांला नष्ट व्हायला नकोत. त्यामुळे आज भारतात शिक्षणाबद्दल काहीही बोलणे अगदी अवघड झाले आहे.

तरीसुद्धा असे म्हणता येईल, की शाळा, कॉलेजेस् वगैरेंतून मिळते, ते औपचारिक शिक्षण. चित्रपट, वर्तमानपत्रे, दूरदर्शन, आकाशवाणी यांतून घडवले जाते, ते लोकशिक्षण. ते पायरीपायरीने वाढत जाणारा अभ्यासक्रम या औपचारिक शिक्षणाच्या व्याख्येत बसत नाही.

औपचारिक शिक्षण अनेकांना मिळत नाही. पण लोकशिक्षण सर्वांपर्यंत पोचते. कारण ज्यांना प्रत्यक्ष लोकशिक्षणाचे राजमार्ग उपलब्ध आहेत, ती मंडळी नंतर 'मौखिक' परंपरा या माध्यमातून इतरांपर्यंत पोचतात. उदाहरणादाखल एकच साखळी पाहू या.

कुटुंबनियोजनाचा निर्णय वरिष्ठ शासकीय पातळीवर. मग जाहिराती, भित्तिपत्रके, चित्रे, इत्यादी आणि शेवटी गावोगावी जाऊन या विषयावर व्याख्याने, प्रवचने, एवढेच नव्हे, तर कीर्तने. राजमार्ग हा मौखिक किंवा लिखित किंवा दृश्य असू शकतो. जुना किंवा नवा असतो. उदाहरणार्थ, वर्तमानपत्र, दूरदर्शन वगैरे नवी साधने; पण कीर्तन, प्रवचन वगैरे त्यामानाने जुनी साधने. राजमार्गाने लोकशिक्षण वैध आणि सर्वव्यापी आहे.

आपल्याकडे लोकशिक्षणासाठी स्वतंत्र शासकीय विभाग नाही. प्रगत देशांतील

विद्यापीठे हे काम आवर्जून करतात. पण इथे मात्र 'मुक्त विद्यापीठ' सुद्धा औपचारिक शिक्षणप्रवाहाचा विस्तार याच कामात गुंतले आहे. बहिःशाल व्याख्यानमाला हा मात्र लोकशिक्षणाचा उपक्रम मानता येईल. राजमार्गांविषयी बोलणे त्या मानाने सोपे आहे. पण विस्तारभयास्तव सध्या थांबते.

आता आडमार्ग पाहू. त्यांतला प्रमुख म्हणजे 'करमणुकीतून' शिकवणे किंवा 'जाहिरातीतून' परिणाम घडवणे. वाङ्मयामधे पंचतंत्र, हितोपदेश, इसापनीती ही या करमणुकीतून नकळत शिक्षण या पंथाची उत्तम उदाहरणे आहेत. जाहिरातीतून 'अमुक' केले, तर तुमचाच फायदा आहे, हा जो संदेश असतो, तोही यातलाच; पण अधिक बटबटीत प्रकार. इतर ललित कलांचाही यात समावेश आहे.

पुस्तके, वर्तमानपत्रे, आकाशवाणी, दूरदर्शन ही माध्यमे मूलतः राजमार्ग म्हणून अस्तित्वात आली असली, तरी आडमार्गानेच त्यांचा मोठा भाग व्यापलेला असतो. 'बातम्या' हा राजमार्ग; पण त्यांची जागा दिवसेंदिवस कमी होत चालली आहे. जाहिराती वाढत आहेत.

ज्या छोट्या आदिवासी समाजात लिहिणे, वाचणे नाही, तेथेही गुरू-चेला परंपरा हा मौखिक राजमार्ग आणि 'करमणूक' हा आडमार्ग आढळतोच.

लोकशिक्षणाचा वाममार्ग अर्थातच समाज निषिद्ध मानतो. त्यार कडाडून टीका केली जाते. पण प्रत्येक आधुनिक समाजात हे मार्ग अस्तित्वात आहेत, असेच आढळते.

वाममार्गाची व्याख्या अवघड आहे, पण उदाहरणे देणे सोपे आहे. उदाहरणार्थ; ग्रॅफिटी किंवा संडासवाङ्मय. लिहिणाऱ्याला अपराधी भावना असते; पण सांगावेसेही वाटत असते, असा हा प्रकार किंवा क्रांतिकाळात पसरवले जाणारे गुप्त शिक्षण. यात हेतूच 'जैसे थे' ला उलथवणे हा असतो. इथे शिकवणाऱ्यांना अपराधी भावना नसून आत्मगौरव आणि हौतात्म्याची तयारी वाटत असते.

थोडक्यात सांगायचे, तर आजच्या प्रत्येक समाजात राजमार्ग, आडमार्ग आणि वाममार्ग या तिन्ही मार्गांनी लोकशिक्षण घडते आहे.

ज्याला समाजाची मान्यता आहे आणि ज्याचे उघड उद्दिष्ट नवीन पिढीला शिकवणे हेच आहे, ते सर्व राजमार्ग. मग त्या चाकोरीबाहेरच्या शाळा असोत वा साक्षरतेचे वर्ग असोत.





अनुक्रमणिका

आडमार्ग या शब्दाबद्दल मात्र गैरसमज नको. आडमार्ग म्हणजे द्राविडी प्राणायाम करून घेतलेला घास. हेतू शिकवण्याचा आणि मनोरंजनाचा – असा दुहेरी. कधी एक वरचढ ठरतो, तर कधी दुसरा.

वाममार्ग नसावेत, यासाठी समाज खूप धडपडतो. पण 'गर्द'चे व्यसन लावण्यासाठी केलेल्या पार्ट्या, तरुण मुलींना वेश्याव्यवसायात ओढण्यासाठी दाखवलेली प्रलोभने, इत्यादी गोष्टी आधुनिक समाजामधून नष्ट करता आलेल्या नाहीत.

परंतु वाममार्गाचा दुसरा उपविभाग म्हणजे 'मान्य' व्यवस्थेला बंड करून बदलण्याचा, तो मात्र स्वरूप बदलतो. म्हणजेच जर त्या विचारप्रणालीचा मोठ्या प्रमाणावर स्वीकार झाला, तर आजचा जो वाममार्ग, तोच उद्याच्या राजमार्गाचा 'आशय' होऊ शकतो.

एकदा वाटत होते, की वाममार्गाच्या या दोन विभागांना वेगवेगळी अधिक समर्पक नावे द्यावीत. परंतु नंतर माझ्या लक्षात आले, की गुप्त संघटना, भूमिगत वाङ्मय, कोडवर्ड वापरून सदस्यत्व मर्यादित ठेवणे या तांत्रिक बाबी समान असल्याने वाममार्गाचे दोन विभाग पाडताना माझ्या मनातले निकष हे माझ्या सध्याच्या मूल्यव्यवस्थेवरच आधारित आहेत.

लोकशाहीखेरीज इतर प्रकारे निर्णय घ्यावेत, असे सुचवणारे लोकशिक्षण भारतात वाममार्गात मोडले, तरी हुकुमशाहीत कदाचित ते राजमार्गात मोडेल; आणि तेथे लोकशाही जपण्यासाठी गुप्त संघटना, इत्यादींचा अवलंब करावा लागेल.

'जैसे थे', 'मान्य बदल' (म्हणजे आजचे 'आर् अँड डी' संशोधनाचे प्रयत्न आणि 'बंडात्मक बदल' हे तिन्ही प्रवाह आजच्या प्रत्येक समाजात लोकशिक्षणामधे दिसतात. बंडात्मक बदलाचा काही भाग आपण 'गुन्हेगारी' समजतो आणि काही भाग 'ध्येयवाद' समजतो.

**१, मनःश्री अपार्टमेंट, १६३/१/२ए, औंध टी. पी. एस्., पुणे ४११ ००७**





अनुक्रमणिका

# लोकशिक्षण आणि मराठी भाषा

अशोक रा. केळकर

[लोकशिक्षण आणि मराठी भाषा या विषयाचा साकल्याने विचार करावयाचा असेल, तर शिक्षण, समाज आणि संस्कृती यांचा सखोल विचार करावा लागेल, तसेच शिक्षणाची अनेकविध माध्यमे आणि भाषा, शिक्षणव्यवस्था आणि लोकशिक्षण, लोकशिक्षण आणि भाषाव्यवहार यांचा मागोवा घेऊन लोकशिक्षणाच्या पाच पातळ्या तपासाव्या लागतील]

**१. शिक्षण, समाज, आणि संस्कृती**

कोणत्याही मानवसमाजाला शिक्षणाची तरतूद करावी लागते, मग तो समाज म्हणजे एखादी वन्य टोळी असो, शेती करणारी वाडी असो, सर्कशीचा किंवा नाटकाचा खेळ करणारी फिरती कंपनी असो, किंवा उपनगरीय वसाहत असो. आणि याचे कारण अगदी साधे आहे. माणसाला उपजत शहाणपण असते, पण ते पुरेसे नसते, ते विकसित करावे लागते, ती पुंजी वाढवावी लागते. म्हणजेच त्या शहाणपणाचे रूपांतर त्या त्या मानवसमाजाच्या संस्कृतीमध्ये करावे लागते. असे रूपांतर करण्यावर त्या समाजाचा गाडा चालता राहणे, त्या समाजाच्या वर्तमानकाळामधल्या लोकव्यवहाराचे नियमन होणे अवलंबून असते. ह्या रूपांतरालाच आपण शिक्षण हे नाव देतो. शिक्षणाची तरतूद कितपत आहे, मिळणारे शिक्षण काय लायकीचे आहे, किती उत्कृष्ट किंवा निकृष्ट आहे, यामुळे त्या समाजाचा इतिहास कसा घडेल हे ठरत असते. कसे ते पाहा. एकाच वेळी शिक्षण भूतकाळाशी सांधा जोडते, भूतकाळात त्या समाजाने जमवलेला निधी शिक्षणामार्फत चालू पिढीच्या हवाली केला जातो, आणि तसेच भविष्यकाळाची तरतूद करते. जुन्या निधीमध्ये काही भर घालायची असते आणि तो येत्या पिढीच्या हवाली करण्याअगोदर त्याचा टाकाऊ ठरलेला भाग काढून टाकायचा असतो ही महत्त्वाची जाणीव शिक्षण चालू पिढीला करून देते. भारताच्या

इतिहासात ही जाणीव जवळजवळ हरवली आणि त्याचे विपरीत परिणाम आपण भोगतो आहोत. याचा बोध एकोणिसाव्या शतकात भारतीय प्रबोधनामधल्या विचारवंतांना झाला आणि भारतीय समाजाचे किंवा त्यामधल्या आपापल्या मुस्लिम, दलित, इ. पोटसमाजाचे भवितव्य, शिक्षणाचा दर्जा आणि प्रमाण सुधारण्यावर अवलंबून आहे, अशी एकच हाकाटी झाली.

शिक्षणाची तरतूद करायची, म्हणजे नेमकी कशाची तरतूद करायची? ज्याचे शिक्षण करायचे, त्याच्यापर्यंत कोणकोणत्या गोष्टी पोचवायच्या? शिक्षणामध्ये लोकव्यवहाराचे नियमन करवण्याची ताकद कशामुळे येते? शिक्षार्थ्याला कोणत्या प्रसंगाची कशी दखल घ्यायची आणि त्या प्रसंगी नेमके कसे वागायचे, हे ठाऊक करून द्यायचे असते. उदाहरणार्थ, समोर तान्हे मूल असले, तर त्याला केव्हा उचलून घ्यायचे, केव्हा त्याच्या रडण्याकडे दुर्लक्ष करायचे, त्याला उचलून घ्यायचे, म्हणजे नेमका कुठे आधार द्यायचा, कुठच्या अवयवाला जपायचे, आडवे-उभे, हातांच्या पाळण्यात, खांद्यावर, कडेवर, पाठीवर, कमरेवर कसे तोलायचे - ह्या सगळ्या गोष्टींबद्दल प्रत्येक समाजात काही संकेत असतात. त्या त्या समाजाच्या बालसंगोपनाशास्त्रात हे संकेत समाविष्ट असतात. हे संकेत कुणी, कुणाला, केव्हा शिकवायचे हेही प्रत्येक समाजात ठरलेले असते. उदाहरणार्थ, एखाद्या समाजात मुलेमुली किंवा पुरुषमंडळी तान्ह्या मुलांच्या वाट्याला फारशी जातच नाहीत. तान्हे मूल रडत असले, तर आई, दाई कोण असेल, त्या योग्य व्यक्तीला खबर दिली, की त्यांचे काम संपले. पण समजा, अमक्याने अमक्याला तान्हे मूल कसे उचलायचे, हे शिकवायचे आहे. म्हणजे काय शिकवायचे आहे? काय शिकायचे आहे?

(क) काही तथ्ये (facts) शिकायची आहेत. उदाहरणार्थ, मुलाच्या कण्याला मान आणि कंबर या ठिकाणी आधार लागतो. मुलाचे डोके विशेष जड असते.

(ख) काही गोष्टींच्या बाबतीत नजर (insights) मिळवायची असते. उदाहरणार्थ, मुलाला सामान किंवा बोचके समजून उचलायचे नसते.

(ग) काही गोष्टींकडे काही पद्धतींनी बघायला (attitudes) शिकायचे असते. उदाहरणार्थ, मूल रडले, की त्याला उचलले पाहिजे, असे नाही, मुलाला आत्मविश्वासपूर्वक उचलावे.

(घ) काही नैपुण्ये किंवा कौशल्ये (skills) शिकायची असतात. उदाहरणार्थ,

मुलाने मध्ये उसळी घेतली, तर हातांच्या चपळ आणि योग्य हालचाली करून त्याला पडू न देणे.

तथ्ये, अंतर्दृष्टी, वृत्ती, नैपुण्ये मिळून शिकण्याचा आशय ठरतो. शिकणारा हा आशय हस्तगत करतो, म्हणजेच शिकणाऱ्याच्या वर्तनात इष्ट ते फेरफार होतात. शिकवणारा फक्त सुइणीचे काम करतो. ज्याने कळा द्यायच्या, ज्याला साफल्याचा आनंद मिळायचा, ज्याच्या शहाणपणाचा विकास व्हायचा, तो शिकणारा स्वतःच. सुईण काय करते? शिकवणारा फक्त शिकणाऱ्याला इष्ट त्या प्रकारचे अनुभव मिळतील अशी तरतूद करतो. त्याच्यामुळे वर्तनात झालेला फेरफार इष्ट तोच राहील याची काळजी घेतो. चुकले, तर सांभाळून घेतो, साधले, तर प्रोत्साहन देतो. हे जे इष्ट त्या प्रकारचे अनुभव ते म्हणजे शिक्षणाचे माध्यम. भाषा हे शिक्षणाचे एकमेव माध्यम नाही हे एव्हाना लक्षात यावे. शिक्षणाच्या माध्यमाचा अधिक विचार करण्यापूर्वी शिक्षणाच्या आशयाचा आणखी एका बाजूने विचार करू.

तथ्ये, अंतर्दृष्टी, वृत्ती, नैपुण्ये यांच्या रूपाने आपले शहाणपणाचे संचित, आपले संकेत, प्रघात, रीतिरिवाज, थोडक्यात म्हणजे आपली संस्कृती ही समाज पुढच्या पिढीपर्यंत पोहोचती करतो. तसे करताना केवळ संकेत पोहोचते करून भागत नाही. त्या संकेतांना अर्थवत्ता प्राप्त करून द्यावी लागते. त्या संकेतांना पुष्टी येईल, अशी व्यवस्था समाजात असावी लागते. संकेतांना संस्कारांची जोड द्यावी लागते. अशा संकेतांचे पोषण करणाऱ्या संस्कारांचाही शिक्षणाच्या आशयामध्ये समावेश व्हावा लागतो. म्हणजेच पुढील गोष्टींचा समावेश करावा लागतो.

(क) कालदर्शन : समाजाच्या सदस्यांना आपल्या समाजाचा भूतकाळ कसा होता, भवितव्य कशा प्रकारचे आहे, आणि वर्तमान जमाना कसा आहे, याची एक विशिष्ट जाणीव असते. ती जाणीव म्हणजे त्या समाजाचे कालदर्शन.

(क १) भूतकालाची स्मृती, इतिहासदर्शन : उदाहरणार्थ, अमुक संकेत अमुक दिव्य पुरुषाने घालून दिले, अमुक संकेतांचा अमुक प्रसंगी लाभ झाला, अमुक घटनांनी पावन झालेल्या भूमीत आपण राहतो.

(क २) भविष्यकाळाची अपेक्षा, भवितव्यदर्शन : उदाहरणार्थ, आपल्याला अमक्यांची बरोबरी करायची आहे, त्यासाठी अमुक संकेत आपण पाळले पाहिजेत.

(क ३) वर्तमानकाळाला तोंड देणे, वर्तमानदर्शन : उदाहरणार्थ, आपला समाज शत्रूंनी वेढला आहे, त्यासाठी अमुक संकेत योग्य आहेत.

(ख) सूक्ती, बोधकथा, इत्यादी बोधपर वाङ्मयीन पाथेय : उदाहरणार्थ, कोल्ह्याला द्राक्षे आंबट ही कथा व उक्ती.

(ग) तत्त्वदर्शन : प्रत्येक समाज आपल्या जीवन-पद्धतीचे काही समर्थन देत असतो, आपल्या विश्वाच्या चित्राच्या अचूकपणाबद्दल काही निर्वाळा देत असतो. समाजाचे सर्वच सदस्य सारखेच तत्त्वजिज्ञासू नसतात, पण सर्वांना थोडी तत्त्वजिज्ञासा असते आणि थोड्यांना विशेष तत्त्वजिज्ञासा असते. या जिज्ञासेचे समाधान झाले, की समाजाला आणि संस्कृतीला बळकटी येते.

(क) समाजाची शिक्षणसंस्था, (ख) समाजातील कालदर्शन, बोधवाङ्मय, तत्त्वदर्शन या संस्कारांच्या द्वारे संकेतांचे पुष्टीकरण, आणि (ग) प्रबोधन आणि दंड यांच्या द्वारे समाजाचे अनुशासन ह्या तीन प्रकारच्या संस्थांमुळे समाजाचे नियमन सुसाध्य होते.

ह्या नियमनाला, संकेतांना, कालदर्शनाला, तत्त्वदर्शनाला छोटामोठा ढळ पोचू शकतो. ह्या नियमनामध्ये अंतर्विरोध, अंतर्गत विसंगती निघाल्यामुळे हे नियमन दुबळे होऊ शकते. ह्या नियमनात अनुस्यूत असलेला शहाणपणा परिस्थितीला पुरा पडत नाही, समाजाला माघार घ्यावी लागते, याची जाणीव प्रखर होऊ लागली, तर नियमनाची पकड ढिली होते. भवितव्यदर्शनामधला आत्मविश्वास ढळमळू लागतो. ह्या नियमनापेक्षा अगदी वेगळ्या प्रकारे नियमन ज्याचे होते अशा समाजाचा परिचय झाला, सीमेवरचे प्रदेश, विविध समाजांचे स्थलांतर, लढाया, पर्यटन, महानगरांमधील अनेकजिनसी जीवन अशा निमित्तांमुळे विविध समाजांची आपसांत घसट वाढली, म्हणजे आपले नियमन तेवढेच खरे, आपली जीवनपद्धती तेवढी खरी ही भावना (एथ्नोसेंट्रिझम्) काहीशी क्षीण होते. सगळ्यांत मोठा ढळ एखादे मोठे युद्ध, परचक्र, भारताच्या विभाजनासारखा एखादा उत्पात यामुळे पोचू शकतो. समाजावर एक आघात होऊन समाजजीवनाला क्षती (ट्रॉमा) पोहोचते म्हणा ना.

असा ढळ पोचला, म्हणजे शिक्षणव्यवस्थेमध्ये, शिक्षणाच्या आशयामध्ये, शिक्षणाच्या पद्धतीमध्ये मोठे बदल करण्याची गरज भासू लागते. हे बदल इष्ट त्या दिशेने आणि वेळेवर होतात की नाही, यावर समाजाची नवी घडी कितपत बसते,

नवे नियमन कितपत स्थिर होते, नव्या संकेतव्यवस्थेमध्ये कितपत अर्थ भरला जातो, हे अवलंबून आहे. समाजामध्ये राज्यक्रांती घडवून आणण्यापेक्षाही हे शिक्षणामध्ये परिवर्तन घडवून आणण्याचे काम अधिक जोखमीचे आणि अधिक जिकिरीचे आहे, असा प्रत्यय मानवाच्या इतिहासात कधीकधी मिळतो. (सहज सुचणारे उदाहरण म्हणजे संततिनियमनाविषयी लोकशिक्षण करणारे र. धों. कर्वे.)

**२. शिक्षणाची माध्यमे आणि भाषा**

शिक्षणाचे माध्यम असे म्हटले, की आपल्या मनात हल्ली तरी केवळ भाषा हे माध्यम येते; आणि मग उदाहरणार्थ, मराठीभाषी मुलांचे शिक्षण मराठीत, हिंदीत, किंवा इंग्लिशमध्ये व्हावे किंवा कसे असा विचार चालू होतो. पण ही स्थिती तितकी बरोबर नाही. शिकणे म्हणजे इष्ट त्या प्रकारचे अनुभव मिळाल्यामुळे वर्तनात इष्ट ते फेरफार पडून नवीन नैपुण्य, वृत्ती, अंतर्दृष्टी, तथ्ये हस्तगत होणे, असे जर आपण समजलो, तर इष्ट त्या प्रकारचा अनुभव मिळण्याचे भाषा हे त्यांतल्या त्यांत अप्रत्यक्ष व दुरूनचे माध्यम आहे असेच म्हणावे लागेल. अर्थात भाषा हे साधन दुरूनचे असले, तरी प्रभावी आहे यात शंका नाही. शिक्षणाच्या क्षेत्राबाहेरही जे माणसाचे कायम 'शिकणे' चालू असते, त्यातही हा भाषेचा प्रभाव दिसून येतो. त्यासाठी आपण शेक्सपियरच्या **ओथेलो** नाटकाचा नायक ओथेलो ह्याची साक्ष काढू. ओथेलोवर प्रेम करायला डेज्डिमोना कशी शिकली, तिच्या वृत्तीमध्ये हा फेरफार कसा झाला याचे वर्णन त्याने केले आहे. (अंक १, प्रवेश ३)

Her father lov'd me, oft invited me;
Still question'd me the story of my life.
From year to year--the battles, sieges, for tunes.
That I have pass'd.
I ran it through, even from my boyish days.
To th' very moment that he bade me tell it;
Wherein I spake of most disastrous chances,
Of moving accidents by flood and field;
Of hairbreadth scapes i' th' imminent deadly breach;

... ... This to hear

Would Desdemona seriously incline;
... ... ...        ... ... ...        ... ... ...
She'd come again, and with a greedy ear
Devour up my discourse.

My story being done,
She gave me for my pains a world of sighs;
... ... ...        ... ... ...        ... ... ...
She wish'd she had not heard it, yet she wish'd
That heaven had made her such a man

She lov'd me for the dangers I had pass'd;
And I lov'd her that she did pity them.
This only is the witchcraft I have us'd.

भाषेच्या माध्यमातून मिळणारा परोक्ष अनुभव जर इतका प्रभावी असेल, तर त्याहून तुलनेने कमी परोक्ष, अधिक प्रत्यक्ष अनुभव किती प्रभावी ठरेल? शिक्षणाच्या माध्यमांची आपण एक यादी करू आणि ही माध्यमे उत्तरोत्तर अधिक प्रत्यक्ष, कमी परोक्ष राहतील, अशा क्रमाने ही यादी करू. यादीची सुरुवात भाषेपेक्षाही परोक्ष असणाऱ्या एका शैक्षणिक माध्यमापासून करू.

गणिताची भाषा
लिखित रूपातील भाषा--वाचन, पत्रसंवाद
बोली रूपातील भाषा--एकतर्फी श्रवण
बोली रूपातील भाषा--दुतर्फी संवाद
गायिलेल्या रूपातील भाषा

दृश्यश्रव्य साधनांचा उपयोग
चित्राकृती, स्थिरचित्र, चलचित्र
स्थिरमूर्ती, चलमूर्ती

छायाचित्र, चलछायाचित्र
ध्वनी, ध्वनि-चलछायाचित्र

क्रीडा : अवलोकन, सहभाग
नाट्यांकन : अवलोकन, सहभाग
प्रवास, क्षेत्रीय अवलोकन
कार्यानुभव : प्रायोगिक, क्षेत्रीय
प्रकल्प सिद्धी, कार्यसत्र

साहजिक शैक्षणिक व्यवहारात ही माध्यमे नेहमीच वेगळी राहतात किंवा रहावीत, असा भाग नाही. ती पुष्कळदा सरमिसळ वापरली जातात. उदाहरणार्थ, पुस्तकात बोली संवाद नोंदले जातात आणि चित्रे घातली जातात. नाही तरी ल्यूईस कॅरलच्या ॲलिसने म्हटलेच आहे, 'What is the use of a book,' thought Alice, 'without pictures or conversations?' (Alice's Adventures in Wonderland, ch.1) त्याचप्रमाणे चित्रमालिकेत पात्रांच्या तोंडची भाषणे लिहिली जातात. चलमूर्ती आणि मुद्रित ध्वनिसंकेत यांचे संयोजन करता येईल. गणिताची भाषा आणि रेखाकृती यांचे संयोजन विविध प्रकारचे नकाशे किंवा आलेख यांच्यामध्ये करता येईल. रेखाकृती चलचित्राच्या रूपाने दाखवता येईल. गणिताची भाषा आणि लिखित रूपातील भाषा यांचा संकर तर नेहमीच होतो. किंबहुना भाषा या प्रभावी माध्यमाची जोड इतर सर्वच माध्यमांना देण्याचा मोह कुणालाही होणे साहजिकच आहे. मात्र भाषेची काही वेळा कुरघोडी होऊन या संकरित माध्यमाचा प्रभाव कमी होण्याचा धोका डोळ्यांआड करून चालणार नाही. उदाहरणार्थ, शैक्षणिक अनुबोधपटामधली निवेदने वाचाळ होण्याचा धोका भारतात प्रायः दिसतो. जणू अनुबोधपट-दिग्दर्शकाचा चित्रपट-माध्यमावर म्हणा किंवा आपल्या भावी प्रेक्षकांच्या ग्रहणशक्तीवर म्हणा पुरेसा भरवसा नसावा.

ह्या शैक्षणिक माध्यमांच्या जोडीला मुद्रण आणि प्रकाशन (मग ते पुस्तके, नियतकालिके, भित्तिपत्रके, ध्वनिमुद्रित तबकड्या किंवा फिती, चित्रे व छायाचित्रे, ध्वनि-चित्र-मुद्रित व्हिडियोटेप किंवा फिल्म यांपैकी कशाचेही असो) आणि आकाशगामी प्रक्षेपण (रेडिओ किंवा दूरचित्रवाणी) ही प्रसार-साधने आधुनिक काळात

मिळालेली आहेत. या प्रसार-साधनांच्यामुळे शैक्षणिक माध्यमांना स्थळ आणि काळ यांच्या मर्यादा ओलांडणे सहज शक्य झाले आहे. पूर्वीच्या काळात केवळ प्रवचन, हरिकथा, कीर्तन, निरूपण, वादसभा, चर्चासत्रे, चित्रशाळा, मूर्तिशाळा यांसारख्या प्रसार-संस्थांच्यावर अवलंबून रहावे लागत असे.

आपल्याला सध्या भाषेवर लक्ष केंद्रित करायचे आहे. भाषेच्या विविध वाङ्मयीन आविष्कारांची नोंद या ठिकाणी घेऊन ठेवणे सोयीचे होईल.

एकतर्फी वाचन किंवा श्रवण यांसाठी युक्त :

विवेचन - विश्लेषण
पूर्वीच्या ग्रंथावर भाष्य वा परीक्षण
वर्णन - कथन
बातमीपत्रे, जाहिरात
वाद-संवाद, प्रश्नोत्तरी
रूपककथा, कथा, नाट्य-संवाद

दुतर्फी वाचन-लेखन किंवा श्रवण-भाषण

पत्रद्वारा शिक्षण
बोली लेखी शंका-समाधान कार्यक्रम
वाद-संवाद, प्रश्नोत्तरी यात बोली-लेखी सहभाग
कार्यसत्रामध्ये सहभाग

ज्याप्रमाणे साहित्याचे काव्य, कथा, इत्यादी प्रकार असतात, त्याप्रमाणे हे शैक्षणिक भाषिक सामग्रीचे प्रकार समजावे. ज्याप्रमाणे प्रत्येक साहित्यप्रकाराचे आपापले सामर्थ्य आणि मर्यादा असतात त्याप्रमाणे प्रत्येक शैक्षणिक साहित्यप्रकाराचे स्वतःचे सामर्थ्य आणि मर्यादा असतात. त्यांचा तपशिलवार विचार स्वतंत्रपणे करावा लागेल.




अनुक्रमणिका

### ३. शिक्षणव्यवस्था आणि लोकशिक्षण

शिक्षणाचे कार्य आणि शिक्षणामधल्या संज्ञापनाचे स्वरूप (nature of communication) ह्याचा सामान्य विचार आपण इथवर केला. आता लोकशिक्षणाचे कार्य आणि लोकशिक्षणामधल्या संज्ञापनाचे स्वरूप यात कुठे बसतात हे पाहायचे.

प्रत्येक समाजात शिक्षणाबद्दलच्या ज्या तरतुदी असतात, त्यांची व्यवस्था साधारणपणे तीन पातळ्यांवर कल्पिता येईल.

(क) संपूर्णतः अनौपचारिक : उदाहरणार्थ, आईने मुलीला स्वयंपाक शिकवणे, बापाने मुलाला चांभारकी शिकवणे, आईबापांनी मुलामुलींना वळण लावणे, नाटक इत्यादिकांतून वळण लावणे. कॉफीहाऊसमधील तरुणांची गप्पाष्टके.

(ख) निम-औपचारिक : हरिकथा, कीर्तन, मशिदीला जोडून असलेली मदरसा, अशोकाचे शिलालेख यांसारख्या जुन्या तरतुदी; वृत्तपत्र, रेडिओ इत्यादी महाप्रसारमाध्यमाचा प्रसार व पाठ्यक्रम, वसंत व्याख्यानमाला, प्रौढशिक्षण व निरंतरशिक्षण, भित्तिपत्रके, शैक्षणिक प्रदर्शने आणि संग्रहालये, अभ्यासगट आणि चर्चागट यांसारख्या नव्या तरतुदी.

(ग) औपचारिक : या मूलतः दोन प्रकारच्या आहेत.

ग (१) मान्य, प्रस्थापित आशयाचा प्रसार : शिकवणी, गंडाबंद शिष्याला तालीम, सामूहिक शिकवणी (उदाहरणार्थ, विविध प्रकारचे क्लास), शाळा, महाविद्यालये, इत्यादी.

ग (२) नवनव्या प्रसारयोग्य आशयाचा संचय आणि वितरण : चर्चासत्रे, परिसंवाद, परिषदा, विद्वत्सभांच्या बैठकी, इत्यादी.

ज्याला आपण लोकशिक्षण म्हणतो, ते मुख्यतः निम-औपचारिक वर्गात पडते. त्यात पूर्वीपासून मान्य झालेल्या आशयाचा जसा प्रसार होईल, तसा नव्याने मान्य झालेल्या आशयाचाही प्रसार होईल. बालसंगोपनाचे शिक्षण एकत्र कुटुंब पद्धतीत अनौपचारिक रीतीने मिळत होते, ते आता मिळत नाही, किंवा अनौपचारिक रीतीने मिळाले, तरी नव्याने मान्य झालेल्या बालसंगोपनपद्धतीचे मिळत नाही. ह्या ना त्या कारणामुळे बालसंगोपनाचे शिक्षण आता निम-औपचारिक किंवा औपचारिक शिक्षणव्यवस्थेमधून द्यावे लागत आहे. औपचारिक शिक्षण लहान वयोगटातल्या भावी

मातापित्यांसाठी, तर निम-औपचारिक शिक्षण मोठ्या वयोगटातल्या भावी किंवा नूतन मातापित्यांसाठी अशी वाटणी सध्याच्या सामाजिक चौकटीत करावी लागेल. अशी आशा आहे, की भावी काळात बालसंगोपन हा विषय लोकशिक्षणाच्या कक्षेत घ्यावा लागणार नाही. लोकशिक्षणाचा आशय त्या त्या काळाच्या गरजांना अनुरूप अशा प्रकारचा आणि म्हणून बदलता राहील, हे स्पष्ट आहे.

महाराष्ट्रात लोकशिक्षणाची प्रेरणा तशी जुनी आहे. खरे म्हणजे लोकशिक्षणाच्या दोन काहीशा वेगवेगळ्या प्रेरणा पूर्वीपासून दिसून येतात. एक प्रेरणा रामदासाच्या 'जें जें आपणांसि ठावें, तें तें दुसऱ्यासि शिकवावें, शहाणे करून सोडावे सकळजन' ह्या उद्‌गारामधून प्रकट होते; तीच पुढे अव्वल इंग्रजीत व नंतर 'अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह', 'बाळबोध', 'विविधज्ञानविस्तार', 'लोकशिक्षण' यांसारख्या शीर्षकांमधून व्यक्त होते. दुसरी प्रेरणा कळवळ्याची आहे, 'बुडती हे जन देखवे ना डोळा' या तुकारामाच्या उक्तीत तो उमाळा जसा प्रकट होतो, तसाच तो पुढे 'लोकहितवादी' हे टोपणनाव, 'शेतकऱ्याचा असूड', 'लोकभ्रम', 'आमच्या देशाची स्थिती', 'सुधारक', 'समाजस्वास्थ्य' यांसारखी शीर्षके यांमधून व्यक्त होतो. इंग्रजी अंमल आल्यानंतर या दोन प्रेरणा कायम राहिल्या; पण त्यांचा आविष्कार बदलला, ऐहिक कल्याण आणि त्याला आवश्यक ते ज्ञान यांचा विचार महत्त्वाचा ठरला, लोकजागृतीच्या विचारात राष्ट्र, राष्ट्रिय स्वातंत्र्य, व्यक्तिस्वातंत्र्य, स्त्रीपुरुष-समता, रंजल्यागांजल्यांना नुसता आपलेपणाचा आधार न देता झगडायला शिकवणे इत्यादी भारतीय प्रबोधनातले नवे विचार प्रभावी ठरले. समाजातल्या करत्या लोकांत जे वाद चालू झाले, ते म्हणजे सामाजिक घडी देशी का विदेशी, आधी राजकीय का सामाजिक, धर्मश्रद्धा का वैज्ञानिक दृष्टी, जातिनिर्मूलन का जातिसंघटन, प्रारब्ध का प्रयत्न अशा प्रकारचे वाद लोकांपर्यंत पोचवून त्यांना आपल्या बाजूला वळवणे ही एक नवी तिसरी प्रेरणाही लोकशिक्षणाच्या उद्योगाच्या मागे, उभी राहिली.

स्वातंत्र्य मिळाल्यानंतर जवळजवळ पस्तीस वर्षे झाल्यानंतरही लोकशिक्षणाच्या निकडीच्या गरजा आणि प्रेरणा यांमध्ये महत्त्वाचा फरक पडला नाही. करत्या लोकांतल्या वादांमध्ये आणखी काही वादांची भर पडली. आधी आर्थिक का राजकीय, आधी उत्पादन का समवितरण, सामाजिक समता का आर्थिक समता,

पाश्चात्त्यीकरण का सांस्कृतिक अस्मिता, धर्मांचे नूतनीकरण का दुर्बलीकरण यांसारख्या वादांची ती भर आहे. भारताबाहेर एक मोठे जग आहे आणि त्या जगात भारताला काय स्थान मिळणार हे बऱ्याच अंशी भारतातल्या अंतर्गत घडामोडींवर अवलंबून आहे – याची कालदर्शनात्मक जाणीव तीव्र झाली. भारतीयांची परदेशांत जावक आणि परदेशीयांची भारतात आवक वाढली.

जे बदल पाश्चात्त्य देशांत काही शतके होत होते, ते बदल आपल्याला काही दशकांत घडवायला पाहिजेत, मूळचा कृषिप्रधान, धर्मकेंद्री, स्थितिप्रिय, रूढिनियत, स्तरीभूत, निरक्षर, आणि मंदगती प्रकृती असलेला भारतीय समाज उद्योगप्रधान, विज्ञानसंमुख, नावीन्योन्मुख, करार व कायदा यांनी बंदिस्त, समताप्रवण, साक्षर, आणि गतिमान कसा बनेल - हे आजच्या लोकशिक्षणाचे ध्येय आहे.

लोकशिक्षण जरी निम-औपचारिक असले, तरी त्याचीही काही व्यवस्था असते, काही पातळीवार विभागणी असते. जो एका पातळीवर लोकशिक्षक असतो, उदाहरणार्थ, सामाजिक कार्यकर्ता किंवा गटविकास अधिकारी, तो दुसऱ्या पातळीवर शिक्षार्थी ठरतो. मकॉलीच्या झिरपा सिद्धांताचा हा खरा अर्थ आहे. शिक्षण आपोआप झिरपेल, अशी वाट पाहत बसायचे नाही, तर वरच्या पातळीवरच्या शिक्षार्थ्याने खालच्या पातळीवर लोकशिक्षक बनायचे असते. त्या त्या पातळीवर लोकशिक्षणाचा आशय, शिक्षकवर्ग, शिक्षार्थिवर्ग, शिक्षणमाध्यम, शिक्षणाची भाषा बदलत जाईल, यांचे भान आपण ठेवायला पाहिजे. लोकशिक्षण देता देता लोकशिक्षकही त्यातून काही शिकत असतो, तो बदलत असतो, त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास होत असतो हे तर खरेच; पण त्याचबरोबर त्याचेही शिक्षण व्हायला पाहिजे, त्याची बौद्धिक वाढ खुंटता कामा नये, त्याला शिकवणाऱ्या तज्ज्ञांनाही आपल्या अनुभवाचा फायदा आपण करून देऊ शकतो हा आत्मविश्वास त्याच्यामध्ये जागवला पाहिजे.

सध्याच्या भारतीय समाजाची विभागणी निदान महाराष्ट्रापुरती लोकशिक्षणाच्या दृष्टीने किती पातळ्यांवर करता येईल, याची मांडणी तक्ता १ मध्ये थोडक्यात करून दाखविली आहे, ती आता पाहा.

**तक्ता १ : लोकशिक्षणाच्या पातळ्या**

| लोकशिक्षणाची पातळी | शहरी परिसर (महानगरपालिका असणारी गावे, त्यांना लागूनचा भाग) | निमशहरी परिसर (नगरपालिका असणारी गावे, औद्योगिक वसाहती) | ग्रामीण परिसर व वन्य परिसर |
|---|---|---|---|
| १. सुबुद्ध | सुशिक्षित | -- | -- |
| २. वर्तमानपत्री | शिक्षित | सुशिक्षित | -- |
| ३. शाळकरी | साक्षर | शिक्षित | शिक्षित |
| ४. बाळबोध | निरक्षर | साक्षर | साक्षर |
| ५. अतिबाळबोध | -- | निरक्षर | निरक्षर |

शिक्षार्थ्यांची औपचारिक शिक्षणाची पातळी आणि त्याचा परिसर ह्या दोनही गोष्टींवर लोकशिक्षणाला योग्य अशी पातळी अवलंबून असते, हे लक्षात घेणे महत्त्वाचे आहे. उदाहरणार्थ, शहरी कामगार हा केवळ साक्षर असला, तरी निमशहरी या ग्रामीण शिक्षित कर्मचाऱ्याइतकाच बहुश्रुत असतो, हे आपण त्याच्या निम-औपचारिक अशा शिक्षणाची म्हणजेच लोकशिक्षणाची पातळी ठरवताना ध्यानात ठेवायला पाहिजे. औपचारिक शिक्षणाची पातळी विचारात घेताना सुशिक्षित म्हणजे महाविद्यालयातून गेलेला, शिक्षित म्हणजे शाळांत परीक्षा उत्तीर्ण झालेला, साक्षर म्हणजे ज्याला खरोखरच सलग मजकूर लिहिता-वाचता येतो असा (केवळ सही करता येत असल्याने शिरगणतीत साक्षर म्हणून धरला गेलेला असा नव्हे), आणि निरक्षर म्हणजे इतर सर्व (यात अक्षरओळख विसरून गेलेला, जेमतेम सही करणारा यांसारखे, निमसाक्षरही धरावे) अशा पद्धतीने पातळ्या ठरविल्या आहेत. ही सर्वच वर्गीकरणे -- सुशिक्षित, शिक्षित इत्यादी; शहरी, निमशहरी इत्यादी; सुबुद्ध, वर्तमानपत्री इत्यादी -- हवाबंद नाहीत हे उघड आहे. भारतीय समाजाचा विकास होईल, तसा पातळी पाच, पातळी चार यांचा क्रमाने लोप होईल, असे समजायला हरकत नाही. त्याचप्रमाणे विकासाबरोबर ग्रामीण परिसरातील संज्ञापनांचे चित्र क्रमाने आजच्या निमशहरी, नंतर शहरी परिसराच्यासारखे व्हावे आणि निमशहरी परिसरांचे आजच्या शहरी परिसराच्या सारखे व्हावे. (या आशावादाला एक आधार, म्हणजे आजच्या शहरी परिसराचे चित्र सुमारे पन्नास वर्षांपूर्वीचे चित्र आजच्या निमशहरी

परिसरासारखे होते.) लहान समुदायापुढे बोलताना पातळी थोडी उंचावली, तरी चालते, मोठ्या समुदायापुढे बोलताना गर्दीची मनोभूमिका ध्यानात घ्यावी लागते.

लोकशिक्षणाची भाषेखेरीज इतरही माध्यमे आहेत. (उदाहरणार्थ, दृश्य-श्रव्य माध्यमे) ह्याची नोंद आपण मागेच घेतली आहे. संज्ञापनाच्या पातळ्या (levels of communication) म्हणून ज्या आपण आताच पाहिल्या, या भाषेइतक्या इतरही माध्यमांनाही लागू पडतील. उदाहरणार्थ, पातळी एक किंवा दोन यांवर जी चित्रे किंवा छायाचित्रे सहज समजतील आणि रुचतील, तीच पातळी चार किंवा पाच यांवर समजतील आणि रुचतीलच, असा भरवसा देता येत नाही. भाषेखेरीज इतर माध्यमांचाही या दृष्टीने अधिक शोध घेणे जरूर आहे. एखाद्या माध्यमाचा प्रभावीपणा आणि आकर्षकपणा हाच एक अडथळा देखील होऊ शकतो. उदाहरणार्थ, पातळी चार आणि पाच यांवर शैक्षणिक अनुबोधपट दाखवणाऱ्यांना याचा अनुभव असेल -- कुटुंबनियोजनाबद्दलचा चित्रपट दाखवायचा, तर लहान मुलांना दूर ठेवणे मुश्किल होते, पातळी तीनवर हसता खेळता शिक्षण द्यायचे, तर हसणे-खेळणे जास्त, शिक्षण फारच कमी, असे होण्याचा धोका टाळावा लागतो.

सध्या आपल्याला भाषिक संज्ञापनावर, भाषाव्यवहारावर लक्ष केंद्रित करावयाचे आहे.

**४. लोकशिक्षण आणि भाषाव्यवहार**

कोणताही भाषिक व्यवहार घेतला, मग तो लोकशिक्षणाचे माध्यम म्हणून घडलेला असो किंवा इतर कोणताही असो, तर त्याला तीन अनुबंध असतात, तो तीन गोष्टींनी ठरतो असे म्हणता येईल --

(क) भाषाव्यवस्था : वाक्यरचना, शब्दयोजना, आणि अक्षरांची तोंडी किंवा लेखी मांडणी कशी आहे, याच्यावर तो भाषिक संदेश ऐकणाराला-वाचणाराला नीट समजतो का हे ठरेल.

(ख) प्रस्तुत परिस्थिती : त्या भाषिक संदेशात येऊन गेलेला विषय, वर्णन केलेली वस्तुस्थिती, केलेले आवाहन यांचा सांधा ऐकणारा-वाचणारा याच्या अनुभवाशी जुळतो, की नाही, तो विषय त्याला कितपत परिचित किंवा परिचयसुलभ आहे याच्यावर तो भाषिक संदेश कितपत भिडतो, पटतो, हे ठरेल.

(ग) प्राप्तपरिस्थिती : त्या भाषिक संदेशाचे संज्ञापन होते, त्या प्रसंगीची परिस्थिती, संदेश कुणाकडून, कुणामार्फत, कोणत्या माध्यमातून, केव्हा, कुठे पोचला, आणि कोणत्या निमित्ताने, कोणत्या हेतूनिशी पोचवला गेला, याच्यावर त्या भाषिक संदेशामुळे तो ऐकणारा-वाचणारा याच्या जीवनावर नेमका काय आणि किती प्रभाव पडतो, हे ठरेल.

लोकशिक्षणाच्या क्षेत्रामधले उदाहरण घेऊन या तीन अनुबंधांचे अधिक स्पष्टीकरण करता येईल.

(क) लोकसुलभ अशी भाषेची मांडणी : 'प्रस्तुत भाषणाचा विषय परित्यक्त महिलांची समस्या हा होय' असे काही म्हणण्यापेक्षा 'आज आपण टाकलेल्या किंवा सोडलेल्या बायकांच्या प्रश्नाबद्दल बोलणार आहोत', असे काही म्हटलेले बरे. (हल्ली 'परितक्त्यांचा प्रश्न' हा उच्चार सरसकट ऐकू येतो. शब्द परिचयसुलभ नसला की असे होते.)

(ख) लोकपरिचयक्षम असा भाषेतून मांडलेला शैक्षणिक विषय 'पुरातन काळच्या ग्रीसमध्ये स्त्रियांचे स्थान' यावर काही सांगण्यापेक्षा 'तलाकपीडित बायकांचे प्रश्न' यावर काही सांगणे बरे.

(ग) लोकानुरंजक अशी भाषेच्या माध्यमातील शैक्षणिक पद्धती : तलाकपीडित बायकांच्या प्रश्नाबद्दल काही सांगायचे, तर एखादी तलाकपीडित बाईच जर बोलली, किंवा तलाकाची झळ ज्यांना लागली आहे, लागण्याची शक्यता आहे, अशा बायकांपुढे जर भाषण झाले किंवा जवळपास नुकतेच एखादे ठळक तलाकपीडनाचे उदाहरण घडले आहे, अशा प्रसंगी जर ते भाषण झाले, तर त्या भाषणाच्या द्वारा ऐकणारांच्या वर्तनात इष्ट ते परिवर्तन होण्याचा संभव अधिक. अशा परिवर्तनासाठी जरूर ती तथ्ये (कायद्याच्या तरतुदी), अंतर्दृष्टी (कायदा आणि व्यवहार यांच्या नात्या-मधील मेख), वृत्ती (मेहरबानीचा सवाल नसून, हक्कांचा सवाल आहे), नैपुण्ये (आपली बाजू वकिलाला नीट सांगता येणे) ही लोकशिक्षणाच्या अशा स्वरूपाच्या कार्यक्रमात एक किंवा अनेक हप्त्यांनी शिक्षार्थ्यांच्या पर्यंत पोचवायला लागतील.

कोणताही लोकशिक्षणाचा कार्यक्रम आखताना या तीन अनुबंधांना धरून त्याची फोड करायला पाहिजे. लोकसुलभता, लोकपरिचयक्षमता, आणि लोकानुरंजकता

यांचे अंदाज अर्थातच सापेक्ष राहणार. त्या त्या कार्यक्रमातले शिक्षार्थी लोक कोणते ह्याची पक्की जाणीव असल्याखेरीज असले अंदाज नीट घेता येणार नाहीत. लोकशिक्षणाची प्रेरणा प्रबोधन, कळवळा, अनुयायी मिळवणे अशी कोणती तरी पाहिजे हे तर खरेच; पण केवळ प्रेरणेने भागत नाही. भाषेवर थोडी हुकमत, प्रस्तुत विषयाचे पक्के ज्ञान, आणि शिक्षार्थी-वर्गाचा स्वच्छ अंदाज यांची तितकीच जरुरी आहे.

आता आपण लोकशिक्षणासाठी माध्यम म्हणून जी भाषा वापरायची, त्या भाषेची मोडणी, विषयाची निवड आणि मांडणी, शैक्षणिक पद्धती या तीनही अंगांचा क्रमाने थोडक्यात विचार करू.

**भाषेची मोडणी :** भाषेच्या मोडणीचा विचार करताना मागे आपण लोकशिक्षणाच्या ज्या पाच संज्ञापन-पातळ्या कल्पिल्या, त्यांचा निश्चितच उपयोग होईल. बोलण्याची भाषा आणि लेखनाची भाषा यांचा थोडा वेगळा विचार करावा लागतो, याचेही अवधान ठेवायला पाहीजे.

पातळी १ दहाबारा-अक्षरी शब्द वापरता येईल. जोडाक्षरे, ऋकार यांची अडचण नाही. लेखी वाक्याची लांबी पंचवीस शब्दांपर्यंत जाऊ शकेल; बोलताना वीस शब्दांपर्यंत 'मागोवा', 'किल्मिष', 'थियरी' यांसारखे अल्पपरिचित जुने, संस्कृत, इंग्रजी शब्द शेकडा तीसपर्यंत जाऊ शकतील. 'मुंबईहून आला तर', 'मुंबईहून आल्यास', 'मुंबईहून येताना', 'मुंबईहून येणारा' यांसारखी पोटवाक्ये वाक्यात तीन-चारपर्यंत असायला हरकत नाही. परोक्ष, अमूर्त कल्पना सोदाहरण द्यायला हरकत नाही. समकालीन स्थानिक संदर्भ आवश्यक नाही.

पातळी २ : सातआठ-अक्षरी शब्द वापरायला हरकत नाही. जोडाक्षरे, ऋकार बेतानेच असू देत. वाक्याची लांबी पंधरा शब्दांपर्यंत, बोलताना दहा शब्दांपर्यंत, अल्पपरिचित शब्द शेकडा पंचवीसपर्यंत, पोटवाक्ये वाक्यात एक-दोनपर्यंत. आकडेवारी अगदी थोडी. परोक्ष, अमूर्त कल्पना सोदाहरण थोड्या द्यायला हरकत नाही. समकालीन स्थानिक संदर्भ उपकारक ठरतो.

पातळी ३ सहा-अक्षरी शब्द चालतील, लेखनात मात्र चार अक्षरांपर्यंत. जोडाक्षरे, ऋकार शक्यतो कमी. विशेषतः लेखनात वाक्याची लांबी दहा शब्दांपर्यंत, अगदी तोकडी वाक्ये टाळावीत. अल्पपरिचित शब्द शेकडा पंधरापर्यंत. पोटवाक्ये वाक्यात एक-दोनपर्यंत. आकडेवारी एखाद्या वेळी चालेल. परोक्ष, अमूर्त कल्पना

सोदाहरण एखाद्या वेळी चालेल. समकालीन स्थानिक संदर्भ देणे आवश्यक.

पातळी ४ : सहा-अक्षरी शब्द चालतील. जोडाक्षरे, ऋकार शक्यतो कमी, वाक्याची लांबी दहा शब्दांपर्यंत, अगदी तोडकी वाक्ये टाळावीत, अल्पपरिचित शब्द शेकडा पाचपर्यंत. पोटवाक्ये वाक्यात एखादेच. आकडेवारी नको. परोक्ष, अमूर्त कल्पना सोदाहरण एखाद्या वेळी चालेल. समकालीन स्थानिक संदर्भ देणे आवश्यक.

पातळी ५ सहा-अक्षरी शब्द चालतील. जोडाक्षरे, ऋकार शक्यतो कमी, वाक्याची लांबी सात-आठ शब्दांपर्यंत, अगदी तोकडी वाक्ये टाळावीत. अल्पपरिचित शब्द शेकडा पाचपर्यंत, पोटवाक्य वाक्यात एखादेच. आकडेवारी नको. परोक्ष, अमूर्त कल्पना सोदाहरण एखाद्या वेळी चालेल, समकालीन स्थानिक संदर्भ आवश्यक.

प्रत्येक पातळीसाठी जे भाषिक आडाखे दिलेले आहेत, ते अगदी पक्के समजायचे कारण नाही. योग्य ते प्रयोग करून अधिक बिनचूक आडाखे बसवता येतील. पण शेवटी ते आडाखेच. लोकशिक्षणासाठी वापरायचा मजकूर काही अपेक्षित शिक्षार्थ्यांकडून ऐकवून-वाचवून घेणे आणि त्यांना ती भाषा कितपत समजते, पटते, रुचते याचा अंदाज घेऊन कच्च्या आवृत्तीवर संस्कार करून मगच ती पक्की करणे हा केव्हाही उत्तम पक्ष आहे. अशी सामग्री प्रथम एका भाषेत करून घेऊन, नंतर तिचे भाषांतर इतर भाषांत करायचे असते, तिथेही काळजी घ्यावी लागते. 'हमारा देश' यांचे भाषांतर 'आपला देश' करायचे किंवा 'आमचा देश' करायचे, हा विवेक (उदाहरणार्थ) करावा लागतो.

**विषयाची निवड आणि मांडणी :** आत्तापर्यंत लोकशिक्षणाची भाषा लोकसुलभ कशी ठेवता येईल यावर आपण भर दिला. दुर्दैवाने भाषेचा 'भारदस्तपणा' (म्हणजे बोजडपणा) आणि विषयांचे महत्त्व किंवा निकड यांची चमत्कारिक सांगड आपल्या मनात बसली आहे. भाषा विषयाला साजेलशी असावी, हे खरे. पण केव्हा? श्रोत्याची किंवा वाचकाची भाषा समजण्याची प्राथमिक गरज भागल्यानंतर. जी चमत्कारिक सांगड म्हणून सांगितली, तिचा उगम एका जुन्या भारतीय विभागणीमध्ये असावा. शिष्टजन वा बुधजन, त्यांचे भारदस्त विषय, आणि त्यासाठी संस्कृतभाषा एका बाजूला, इतरेजन वा प्राकृतजन, त्यांचे मामुली विषय, आणि त्यासाठी संस्कृतेतर म्हणजे प्राकृतभाषा दुसऱ्या बाजूला -- अशी ती विभागणी, आज त्या विभागणीला चिकटून बसण्यासारखी स्थिती नाही. विचार इंग्रजीमध्ये आणि मांडणी इंग्रजाळलेल्या किंवा संस्कृताळलेल्या मराठीमध्ये ही घातक सवय आपण जेवढ्या लवकर टाकू,





अनुक्रमणिका

तेवढे बरे.

या संबंधात दुसरेही टोक अलीकडच्या काळात गाठले जाते. भाषेची मांडणी लोकसुलभ करण्याच्या नादात विषयाची हानी होते, मांडणी अतिसुलभ होते. या ठिकाणी योग्य तोल साधणे सोपे नाही; पण ते कष्टसाध्य जरूर आहे. शिक्षार्थ्यांची नेमकी गरज लक्षात घेणे त्यासाठी जरूर आहे.

लोकशिक्षणात विषयाची म्हणून काही गरज असते आणि ती पुरी व्हावी लागते. ती पुरी होण्यासाठी जरूर तेवढ्या पारिभाषिक संज्ञा अवश्य वापराव्या, पण मग इतर शब्द अल्पपरिचित नसतील, 'दिसून येणे' ऐवजी 'दृष्टोत्पत्तीस येणे' म्हणू नये, याची अधिकच खबरदारी घ्यायला पाहिजे. मागे शिक्षणाच्या आशयाचा विचार करताना तथ्ये, अंतर्दृष्टी, वृत्ती, आणि नैपुण्ये असा चार प्रकारचा आशय संक्रमित व्हावा लागतो, हे आपण पहिले. तथ्ये आणि नैपुण्ये यांचे संज्ञापन तुलनेने सोपे असते. मांडणीचा एक विशेष काटेकोरपणा आणि क्रमवारपणा, जरूर तो तटस्थपणा, आणि तपशिलांचे भरताड न करता योग्य तेवढा, पुरेसा तपशील पुरवण्याचे भान या प्रकारच्या विषयाच्या मांडणीत लागते. उदा. , लैंगिक बाबतीत बोलताना किंवा ऐकताना शिक्षार्थी लाजणे स्वाभाविक असले, तरी उत्तेजनार्ह नाही. लोकशिक्षकाने आता सुचवलेले पथ्य पाळले, तर या लाजाळूपणाचा अडसर हळूहळू बाजूला होतो. उलट, शिक्षकच लाजू लागला किंवा 'पाघळू' लागला, तर बघायलाच नको! अंतर्दृष्टी आणि वृत्ती यांचे संज्ञापन तुलनेने अवघड असते, अशक्य मात्र नसते. शिक्षार्थ्याला अगोदरपासून कोणती दृष्टी लाभलेली आहे, कोणती वृत्ती लाभलेली आहे, कोणती वृत्ती त्याने अंगीकारलेली आहे, आणि शिक्षणाच्या मार्फत जी इष्ट दृष्टी किंवा इष्ट वृत्ती त्याच्या ठिकाणी आणायची, तिच्याशी त्यांचा कितपत सांधा जुळतो किंवा विरोध येतो, याचा तपास शिक्षणाचा कार्यक्रम आखताना घ्यायला पाहिजे. पुष्कळदा शिक्षक काय सांगतो, यापेक्षा तो स्वतः कसा वागतो, बोलतो, याला या ठिकाणी महत्त्व येते. भाषिक व्यवहारातही तत्त्व अगोदर बटबटीतपणे सांगून मग उदाहरणे, तपशील सांगणे, यापेक्षा उदाहरणे, तपशील यांच्या खुबीदार गुंफणीतून शिक्षार्थ्याला तत्त्व अर्धेअधिक उमजू देणे हा क्रम चांगला. तीच गोष्ट मूल्यांकन आणि समर्थक अनुभवाचा पडताळा यांची समजावी. मूल्यांकन बटबटीतपणे सुरुवातीला येण्यापेक्षा सहजपणे शेवटी आलेले अधिक चांगले, म्हणजे स्थायी परिणाम करणारे. जर तात्पुरता परिणाम साधण्यावरच आपली मदार असली, तर तत्वाकडून उदाहरणाकडे, मूल्यांकनाकडून

अनुभवाकडे हा उलटा क्रम कधीकधी फायदेशीर ठरावा.

विषय शिक्षार्थ्यांना परिचित नसेल, तेव्हा तो त्यांना परिचित असलेल्या दुसऱ्या एखाद्या विषयाशी जुळवून घेत घेत त्याचा परिचय त्यांना करून देणे हे सुरुवातीचे काम ठरेल. एका हप्त्यात एकच विषय किंवा त्याचे शिक्षार्थ्यांच्या आवाक्यात येऊ शकेल, असे एकच अंग घ्यावे. शिक्षार्थ्याचा आवाका अजमावताना मागे सांगितलेल्या पाच पातळ्यांच्या अनुरोधाने विचार करणे उपयोगी ठरेल.

**शैक्षणिक पद्धती :** लोकशिक्षणाच्या पद्धतींचे मध्यवर्ती तत्त्व लोकानुरंजन आहे, याचा उल्लेख मागेच केला आहे. पण लोकानुरंजन म्हणजे लोकानुनय मात्र नव्हे, हे भारतात आवर्जून सांगायला पाहिजे. 'न ब्रूयात् सत्यमप्रियम्', अप्रिय असेल, तर सत्य बोलू नये, असे बजावणाऱ्या देशात प्रवाहाच्या उलट पोहणे ही दुर्मीळ गोष्ट ठरली आहे. लोकशिक्षणाला ही स्थिती निश्चितच मारक आहे.

लोकांची खुशामत करून लोकप्रिय होणे सोपे आहे. तशी खुशामत न करता लोकानुरंजन करायचे, म्हणजे काय? पहिली गोष्ट म्हणजे लोकशिक्षकाने काही पथ्ये पाळावी लागतात. लोकशिक्षणाचा एक भाग म्हणून लोकांच्या भावनांवर जाणूनबुजून आघात करायचा असेल, तर तो भाग निराळा; पण एरव्ही किंवा तसा आघात करताना एरव्हीच्या भावनांवर अभावित आघात होऊ देणे टाळावे. उदाहरणार्थ, एखाद्या समुदायासमोर बोलताना त्याला वंदनीय वाटणाऱ्या एखाद्या व्यक्तीशी जोरदार मतभेद व्यक्त करण्यापूर्वी त्या व्यक्तीच्या ज्या कार्याशी किंवा विचारांशी आपला मतभेद नाही, त्यांच्याबद्दल लोकशिक्षकाने आवर्जून गौरवपर बोलावे. अगदी सुबुद्ध पातळीवर लोकशिक्षण करतानाही हे पथ्य पाळावे. हा ढोंगीपणा नसून पटण्याजोग्या भावनांची ती रास्त कदर आहे.

दुसरी गोष्ट म्हणजे, जिथे लोकांचे मतपरिवर्तन किंवा हृदयपरिवर्तन भाषेच्या माध्यमातून करायचे असेल, तेव्हा ते टप्प्याटप्प्याने करावे. काही वेळा संज्ञापनाच्या निरनिराळ्या पातळ्यांवर हा परिवर्तनाचा वेग वेगवेगळा ठेवावा लागेल. मूलगामी अशी परिवर्तने अखेर वास्तवाच्या रेट्यानेच जास्त करून होतात, भाषेच्या माध्यमातून होणाऱ्या लोकशिक्षणाचे कार्य पुष्कळदा त्यांना गती देण्यापुरते मर्यादित असते, हे ध्यानात ठेवलेले बरे. टप्प्याटप्प्याने परिवर्तन करायला जागा नसेल, तेव्हा जोरदार आघात करावाच लागतो. त्याचा इष्ट परिणाम लगेच दिसला नाही, तरी तो कालांतराने दिसतो. उपहास, विनोद, सरळ वाक्ताडन, इत्यादी साधनांचा वापरही करावा लागतो.

तिसरी गोष्ट म्हणजे, कोणतेही संज्ञापन प्रभावी होण्यासाठी संज्ञापन करणारा वक्ता-लेखक आणि ग्रहण करणारा श्रोता-वाचक ह्यांच्यामध्ये एक नाते प्रस्थापित व्हावे लागते, हे कधीही विसरू नये. त्यासाठी संज्ञापनकर्ता 'महाराष्ट्राचा लाडका लेखक'च असावा लागतो किंवा ग्रहणकर्ता 'प्रियवाचक' किंवा 'मित्र' किंवा 'बंधूभगिनी' पैकी एक असाच असावा लागतो असे नाही. मुद्द्याची गोष्ट ही आहे, की दोघांना एकमेकांची ओळख पटावी लागते. (या ओळख पटण्यालाच हल्ली आपण 'प्रतिमा तयार होणे' असा समाजवैज्ञानिक परिभाषेतला शब्दप्रयोग वापरतो.) ज्याला तळातला कार्यकर्ता म्हणतात, त्याचे आणि त्याच्या मर्यादित समाजाचेही एक असेच ओळख पटवणारे नाते असते. कुठे पाठीवर हात फिरवून सांगायचे, कुठे वाक्ताडन करायचे, कुठे विनोदाने सांगायचे, हे सांगणाऱ्याचे व्यक्तिमत्त्व व श्रोत्यांच्या आणि वाचकांच्या अपेक्षा यांच्यानुसार ठरून जाते.

चौथी गोष्ट म्हणजे, मुख्यतः लहान गटातून होणाऱ्या लोकशिक्षणाबद्दल सांगायची आहे. मागे आपण क्रीडेमध्ये अवलोकन आणि सहभाग अशा दोन पायऱ्या कल्पिल्या. चिनी तत्त्ववेत्ता कुंग फूत्स हा एकदा म्हणाला, "मी ऐकतो, मी विसरतो; मी पाहतो, मी लक्षात ठेवतो; मी करतो, मला समजते", सहभागाचा महिमा हा असा आहे. सहभागाचे आवाहन होते 'आपण' या सर्वनामाने. उदाहरणार्थ, 'टाकलेल्या बायकांच्या प्रश्नाचा आपण विचार करणार आहोत.' पण हे आवाहन ह्या सर्वनामापुरते मर्यादित राहू नये. शिक्षकाचे काम सुईणपणाचे आहे, रिकामी टाकी भरणाराचे नाही. शिक्षार्थ्यांना बोलते करणे अतिशय महत्त्वाचे आहे. मग दोन मुद्दे 'कव्हर' करायचे राहिले, तरी बेश. शिक्षार्थ्यांची भीड चेपण्यासाठी शिक्षकाने स्वतःला मानवेल ती युक्ती वापरावी. त्यांना हसवावे (ओढूनताणून 'जोक्स टाकून' नव्हे), स्वतःच्या उच्चाराला स्थानिक बोलीची डूब द्यावी (सहज जमले तर), स्वतःची थट्टा करावी, स्थानिक संदर्भ पेरावे, आपण मांडलेल्या सिद्धांताचे एक सोपेसे उपयोजन त्यांच्याकडून काढून घ्यावे, आपल्याला त्यांच्याकडून काही नवा ज्ञानाचा कण मिळाला, तर त्याचा आदर करावा. अर्थात ही युक्ती वृत्तीमधून आलेली असावी. खरे आणि उसने यांतला फरक अज्ञ बालकाच्याही लक्षात येते, मग लोकशिक्षणात अभिप्रेत असलेल्या प्रौढ शिक्षार्थ्यांच्या तो तेव्हाच लक्षात येईल.

लोकानुरंजनाचा एक भाग लोकरंजन हाही आहे. गर्दी जमवण्यासाठी सुरुवातीला सिनेमातली गाणी लावणे हा याचा अगदी ढोबळ प्रकार झाला. शैक्षणिक पद्धती,

रंजक, आकर्षक, रोचक असावी, ह्याबद्दल दुमत होण्याचे कारण नाही. पण त्यासाठी थोडे प्रयत्न करावे लागतात. कुटुंबनियोजनाचा प्रचार आकर्षक करण्यासाठी प्रसंगी जाहिराततज्ज्ञांचा सल्ला आणि मदत घ्यायला काहीच हरकत नाही. तो मोफत मिळवता येण्याचीही शक्यता आहे. (तेवढीच जाहिरात-तज्ज्ञांची जाहिरात!)

**५. समारोप**

लोकशिक्षण आणि मराठी भाषा या विषयाचा पुरा आवाका ध्यानात यावा, या बेताने आपण (आम्ही नव्हे) टप्प्याटप्प्याने आढावा घेतला. प्रथम शिक्षण म्हणजे काय, हे शिक्षणाचा सामाजिक आणि सांस्कृतिक अनुबंध पहात पहात आपण स्पष्ट करून घेतले. नंतर शिक्षणाचा भाषाव्यवहाराशी संबंध जोडून घेतला आणि तो तसा घेताना भाषेखेरीज इतर शैक्षणिक माध्यमांकडे ओझरती नजर टाकली. नंतर शिक्षणाच्या संसारात लोकशिक्षणाचे नेमके स्थान कोणते आणि लोकशिक्षणात संज्ञापनाच्या पाच पातळ्या कशा पडतात. हे लक्षात घेतले. एवढ्या पूर्वतयारीनिशी आपण लोकशिक्षण आणि भाषाव्यवहार या मुख्य विषयाकडे आलो. भाषेची मोडणी, विषयाची निवड आणि मांडणी, आणि शैक्षणिक पद्धती या तीन अंगांनी त्यांच्याकडे पाहिले.

हे सर्व करताना आपल्या विषयाचा भारतीय आणि महाराष्ट्रीय संदर्भ आपण जागजागी जोडून घेतला.

ह्या सर्व विवेचनाची उपयोगिता लोकशिक्षणाच्या विविध प्रकारच्या भाषिक आणि दृश्य, श्रव्य सामग्रीचे निरीक्षण आणि परीक्षण करताना आपण पारखून घ्याल, अशी मला उमेद आहे.

**परिशिष्ट**

'कॅच् देम् यंग' ह्या सोपान फिल्म्ज्, पुणे यांनी निर्मिलेल्या शैक्षणिक अनुबोधपटाच्या मराठी रूपांतराचे निवेदन.

**बच्चे . . . शिकायला सच्चे**

१. आई-बाप म्हणजे मुलांचं सर्वस्व, हे तर खरंच. मुलं आईबापांना मानतात, आणि हो, मापतातही! त्यांचं सगळं ती बघत असतात, सगळंच त्यांना कळतं, असं

नाही, पण कळतं, त्याच्यापेक्षा कितीतरी जास्त वळतं; आणि हे सारं लाडीगोडीत, हसतखेळत, खेळीमेळीत. हसतखेळत रुजतं, कायमचं मूळ धरतं.

२. खेळायला किती लवकर शिकावं, तेवढं थोडंच. त्याच चालीवर ...शिकायला किती तरी लवकर खेळावं, तेवढं थोडंच, असंही म्हणा पाहिजे तर. लहान वयात हजीर, तर मोठेपणी वजीर. बच्चे ... शिकायला सच्चे!

३. मुलाला सगळ्यांत अगोदर शिकण्यासारखा खेळ म्हणजे पोहणं. अगदी लहान मूल पाण्याला सहज सरावतं. हो, आपल्या लहानग्या पावलावर तोल सावरायच्या आधीसुद्धा मुलाला पोहायला शिकवा....आणि का शिकवू नये? तसं करून जन्मभर पुरेल, असा आनंदाचा, आरोग्याचा ठेवाच तुम्ही त्याच्या हवाली करता आहात.

योग्य पाया घातल्याचं समाधान तुम्हांला पुरेपूर लाभेल. नुसतं समाधान कसलं, धन्यता देखील, पोहण्याच्या जोरावर तुमचं मूल जसा दुसऱ्याचा दुवा घेईल, तसा स्वतःवर बेतेल, तेव्हा तुम्हांला दुवा देईल.

खोल पाण्यात मूल आत्मविश्वासानं जाऊ लागलं... की समजा, की जीवनाच्या सागरात देखील हा आत्मविश्वास त्याला काही सोडून जाणार नाही.

पोहण्यामुळं स्नायू सुदृढ होतात, तसेच चपळ आणि लवचीक राहतात. त्यामुळं पाहिजे तेव्हा वेग पकडतात. आणि वेगाशिवाय कोणत्याही खेळात काय आहे? शिवाय पोहणं हा संपूर्ण व्यायाम आहे... स्नायू सगळे मोकळे होतात आणि फुफ्फुसं पुरी भरून जातात.

४. तसं म्हटलं, तर लंगडी म्हणजे साधी शिवाशिवीच. पण राज्य येऊ दे, की सगळ्या शरीराचा तोल सांभाळण्याची जबाबदारी येते... आणि कुवतही.

५. कबड्डी म्हणा किंवा हुतुतू म्हणा...तोच दमदार श्वास आणि तीच जोरदार हालचाल, की जो श्वास आणि जी हालचाल आपल्याला पोहताना लागते. कितीही खेळाडू अंगावर येऊ देत, न डगमगता त्यांना अंगावर घेऊन त्यांच्यावर मात करणं ह्याचं नाव कबड्डी.

६. खोखोचा रंग निराळा आहे. तुमची चढाई असू दे किंवा बचाव असू दे, पुढं पळणारा किंवा पाठलाग करणारा असो, दोनही गड्यांना तीच तयारी आणि तोच निर्धार ह्यांची गरज असते. क्रिकेट घ्या, आणखी कुठलाही खेळ घ्या, त्याची तालीम खोखोच्या खेळात मिळते. हुलकावण्या देणं आणि वेग काबूत ठेवून वेग घेणं ही ह्या खेळातली अजोड जोडी. ती त्यातली नाट्यमयता आणि गतिमानता कायम ठेवते.

७. पण सगळ्या भारतीय मैदानी खेळांत मनोहारी खेळ म्हणजे आट्यापाट्यांचा खेळ. तुमच्याकडे शत्रूची फळी फोडून घुसण्याचं काम असो किंवा विरुद्ध बाजूकडून आलेली मुसंडी थोपवण्याचं काम असो, आट्यापाट्यांमध्ये तुम्हांला क्षणभरही बेसावध राहून चालणार नाही.

कधी गिरकी, तर कधी फिरकी, कधी डुबकी, तर कधी सरकती आट्यापाट्यांमध्ये सगळ्या खेळांतल्या सगळ्या खेळ्या तुम्ही आत्मसात् करून जाता.

ह्या भारतीय मैदानी खेळांची मेख अशी आहे, की त्यांना कुढल्याही किमती साधनांची जरुरी नसते, एकं आपलं आद्य साधन सोडलं तर. . . आपलं शरीर.

८. योग म्हणजे चक्क जोडणं. . . आपलं हे आद्य साधन आणि आपल्या चित्तवृत्ती, आणि चित्तवृत्ती कशा? खळबळ असली, तर खळबळणाऱ्या, दबाव असला, तर दबणाऱ्या अशा नव्हेत, तर सुस्थिर आणि समतोल वृत्ती, आणि ही जोड कशानं जोडायची? तर एकचित्त होऊन.

९. सुमारे पावणेदोनशे वर्षांपूर्वी महाराष्ट्रात मलखांबाचा शोध लागला. ह्या मलखांबाची मूर्ती छोटी, स्वस्त आणि टिकाऊ, थोड्या जागेत काम आटोपणारी . . . पण कीर्ती मोठी. हा मल्लाचा खांब केवळ मल्लाला जोड म्हणून उभा राहत नाही, तर त्याला खेळवता-खेळवता शिकवतोही.

तो काय शिकवत नाही? तऱ्हेतऱ्हेच्या हरकती-मुरकती शिकवतो. तुमचे स्नायू, तुमचे सांधे, तुमचा कणा तयार करून देतो. तुमच्यांत कणखरपणा आणि चपळता, लवचीकपणा आणि तोलदारपणा आणतो, सगळ्यांत म्हणजे तुम्हांला अंतराळात पोहायला शिकवतो.

आता एवढी शिदोरी तुम्हांला बांधून दिल्यावर आणखी काय पाहिजे? कोणत्याही खेळाला तुम्ही आपला म्हणा, मलखांबावरून तुम्ही सरळ त्या खेळाकडे झेप घेऊ शकता.

लहान मुलाला किंवा मुलीला मलखांब शिकवा. त्यांना तो कायमचा सोबती आहे. मलखांबाची सवय सुटली, मोठेपणी कोणत्याही कामधंद्यात गुरफटलात, तरी मलखांबावर लहानपणी केलेली कमाई संपून जात नाही.

दोरीचा मलखांब, वेताचा मलखांब या प्रकारात अधांतरी तोल सांभाळण्याला विशेष महत्त्व मिळतं. कधी लाकडी मलखांब दोरीला टांगतात; आणि झाला की सरावासाठी जोडीदार - कुस्ती किंवा ज्यूडो किंवा इतर लढाऊ खेळ शिकण्यासाठी.

१०. पाश्चात्त्यांचे जिम्नॅस्टिक्सचे खेळ म्हणजे काय? भिंतीवरून चालणं, कुंपणावरून उड्या मारणं, चिंचांवर नेम धरून दगड मारणं, किंवा पेरूच्या झाडाला ओळखंबे घेणं ... असल्या माकडचेष्टा मुलं नेहमीच करत असतात. प्राचीन ग्रीकांनी त्यांनाच कसरतीचं डौलदार स्वरूप दिलं, भारतीय व्यायाम आणि पाश्चात्त्य कसरती ह्या परस्परांना पूरक आहेत. बॅले नर्तिकेच्या हालचालींचे प्रसन्न लावण्य आणि डोंबाऱ्यांचं किंवा कोल्हाट्यांचं चपळ नैपुण्य ह्यांचा मनोज्ञ आणि परिपूर्ण मिलाफ इथं दिसून येतो.

११. जिम्नॅस्टिक्समध्ये विविधता तरी किती असते? पाय धरतीवर ठेवायचे असतील, तर पायफाकी उड्या आणि कोल्हाटी उड्या ह्यांतून कितीतरी करामत करता येते. सरळ बीमची दांडी पकडा, जमीन सोडा, आणि हवेचं मैदान तुम्हांला खुलं आहे.

१२. नाहीतर स्प्रिंगबोर्ड किंवा व्हॉल्टिंग हॉर्सवरून उडी घ्या, तुमच्या हातापायांत आपोआप स्प्रिंग येईल.

पोमेल हॉर्सच्या मदतीनं मनगटं, खांदे कमवा आणि पोटाच्या स्नायूंना व्यायाम द्या.

रोमन रिंग्ज आहेतच तुमचे सांधे वळवायला आणि स्नायू दमवायला. आणि सिंगलबार, डबलबार, आणि अनईव्हन बार म्हणजे काही नुसती मनगटांची करामत थोडीच आहे?

१३. पोहणं, भारतीय मैदानी खेळ, योग, मलखांब आणि पाश्चात्त्य जिम्नॅस्टिक्सचे खेळ ... सर्व मिळून एकापुढं एक अगदी लहान वयापासून बाराव्या वर्षापर्यंत एक सुसूत्र शारीरिक शिक्षणाचा कार्यक्रम कसा आखता येईल, हे आताच तुम्ही पाह्यलंत. एवढ्या कमाईच्या जोरावर ती मुलगी किंवा तो मुलगा मैदानावरचा किंवा जीवनाच्या अंगणातला कोणताही खेळ पुढं शिकू शकेल, यात शंका नको.

१४. कोणताही विकसनशील देश घ्या, तो आपल्या सर्व नागरिकांना अक्षरांची ओळख आणि आकड्यांची ओळख व्हावी, म्हणून प्रयत्नशील असतो. पण त्यांना आपल्या शरीराच्या सुप्त सामर्थ्याची ओळख करून देण्याचं काय? निरोगी शरीर आणि निरोगी मन यांची गाठ घालून देणं, म्हणजेच जीवनाची लय पकडणं.

१५. आजची आपली मुलं ... उद्याचे भक्कम आधारस्तंभ. त्यांतलीच काही पुढं नाव काढतील ... ऑलिंपिक खेळांत म्हणा, इतर क्षेत्रांत म्हणा, पण एवढं नक्की,

की कोणीच वंचित राहणार नाही.

जीवन एक मध्यंतर.

बच्चे . . . शिकायला सच्चे.

त्यांना शिकू दे . . .

-- आणि ते मध्यंतर सुंदर वळणावळणांनी ओलांडू दे. (दिग्दर्शक, पटकथा, निर्माताः गोविंद सीताराम हसबनीस, निवेदन-लेखक अशोक रा. केळकर. निवेदक : श्रीराम लागू.)

**इतिकथन**

इंडियन इन्स्टिटयूट ऑव्ह एड्युकेशन, पुणे येथे आचार्य स. ज. भागवत यांच्या स्मृतिनिमित्त झालेल्या चर्चासत्रात (२० - २१ मार्च १९८२) वाचला गेलेला आणि इन्स्टिटयूटच्या **शिक्षण आणि समाज** पत्रिकेत (एप्रिल–सप्टेंबर, १९८२ जोड-अंक) प्रकाशित झालेला निबंध पुनर्मुद्रित. ऋणनिर्देश जे. एस्. स्लॉट्किन, **सोशल ॲंथ्रोपॉलजी** (न्यूयॉर्क : मॅकमिलन, १९५७), प्रकरण १५. गीता सुभाष भागवत, प्रशासकीय मराठी, **नवभारत,** ऑगस्ट-सप्टेंबर, १९८१ जोड-अंक). श्रीमती वसुधा सरदार, श्री. अनिल अवचट, प्रा, सीताराम रायकर यांच्याशी अगोदर झालेली चर्चा.

ताजा कलम १९९२ : इतक्या दिवसांनंतर हा निबंध वाचल्यावर आता लक्षात येत आहे, की तक्ता १ला अनुसरून पहायचे तर तो पातळी १वरून लिहिला गेला आहे. महाराष्ट्रात जी लोकशिक्षणाचे काम करणारी मंडळी शेकड्यांनी आहेत, त्यांतली बहुसंख्य पातळी २ किंवा ३ वरची आहेत. त्यांच्यासाठी कदाचित् त्या त्या पातळीवर या निबंधाचे पुनर्लेखन करायला हवे. कोण करणार?

**७ धनंजय, ७५९/८३, भांडारकर रस्ता गल्ली, पुणे ४११००४**

# वारकरी कीर्तन आणि लोकशिक्षण

**यशवंत पाठक**

कीर्तन हे भारतीय संस्कृतीतील महत्त्वाचे माध्यम आहे. काहींनी ते साधन मानले आहे. तर नवविधा भक्तीत 'कीर्तन' ही दुसऱ्या क्रमांकातली श्रेष्ठ भक्ती आहे. पहिली भक्ती ही 'श्रवण' भक्ती आहे. 'कीर्तन' ही श्रवण व स्मरणभक्ती यांना जोडणारा पूल आहे. सबंध भारतात ही कीर्तनपरंपरा आहे. प्रत्येक राज्यातल्या तिच्या आविष्कार-रीती भिन्न प्रकारच्या आहेत. महाराष्ट्रापुरता विचार केला, तर कीर्तनपरंपरा प्रभावीरीत्या कार्यान्वित होती. आजही काही प्रमाणात ती आहे.

महाराष्ट्रात (१) वारकरी, (२) नारदीय, (३) रामदासी, (४) गाणपत्य, (५) शाक्त अशा प्रमुख कीर्तनपठड्या आहेत. यांमधे नारदीय कीर्तनपठडीअंतर्गत 'राष्ट्रीय कीर्तन' हा एक नवा उपप्रवाह आलेला आहे. हा प्रवाह रामदासी कीर्तनपठडीने थोड्या-फार फरकाने आत्मसात केला आहे. नारदीय कीर्तनपठडीत चटई कीर्तन, चक्री कीर्तन, जुगलबंदी कीर्तन असे काही उपप्रकार आहेत. तथापि, वारकरी पठडी आणि नारदीय (किंवा याला हरदासी कीर्तन हेही नाव आहे.) कीर्तनपठडी महाराष्ट्रात महत्त्वाच्या आहेत. एका लेखात या दोन्ही पठड्यांचा विचार करणे अशक्य आहे. म्हणून वारकरी कीर्तन आणि लोकशिक्षण यापुरता हा विचार करू या.

कीर्तन म्हणजे ईश्वरगुणानुवाद गाणे किंवा कथन करणे. परमेश्वराचे केवल गुणवर्णन म्हणजे कीर्तन. 'कीर्तना'चे अर्थ बघू या.

(१) कीर्तनम् - (कृत् ल्युट्)

(अ) telling, narrating.

(ब) praising, celebrating.

(क) temple; any work of art; building.[१]

(२) कीर्तणे - (सं. कृत्) स्तविणे, स्तुतिस्तोत्रे गाणे, गुण वर्णिणे.

(अ) हरिदास वगैरे वीणादी गानसाहित्य घेऊन देवळात परमेश्वराचे

उभ्याने गुणवर्णन करतात, ते.

(ब) ईश्वरनामाचा जप.

(क) कथिणे - सांगणे. [२]

(३) कीर्त. F (Vulgar for कीर्त्ति.) fame or reputation

कीर्तने V.C. (कीर्त्तन) To celebrate the praise of, to laud, extol, exalt.

कीर्तन n.s. A) Celebrating the praises of God with music and singing.

B) Reciting the name of deity.

कीर्तनभक्ती F Worshipping of the the Deity by chanting his praises and reciting his names.[३]

कीर्तनाचे हे विविध अर्थ येथे मुद्दाम उद्धृत केले आहेत. याचे कारण कीर्तन या संकल्पनेची व्याप्ती ध्यानात यावी. कीर्तन हे जसे ईश्वरगुणानुवादाचे गायन अथवा नामस्मरण आहे, तसे ते भेदविलोपनाकडे जाणारे कसदार माध्यम आहे. तो एक 'भावानुभव' आहे. तो नित्य नवा आहे. त्याच्या धारणा जीवनाभिमुख आहेत. मुख्यत्वे तो सतत नवीन कांही होतो. होता होता मानवी जीवनमूल्यांशी सुदृढ नाते प्रस्थापित करतो. नित्य नवा दिवस जगण्याचे सामर्थ्य कीर्तनात आहे. यात विद्या व कलांचा सुमेळ आहे. तो एकपात्री प्रयोग आहे; परंतु जीवनाची अनेक परिमाणे दर्शविणारा साक्षीभूत अनुभव आहे. यात आपणांस जे जे वाटते, ते ते होता येते. हे कुणालाही होता येते. यासाठी पूर्वअट काहीही नाही. फक्त इथे संवेदनक्षम मन आवश्यक असते. या संवेदना उत्कट व तीव्र असतात. यामुळे वर्ण्यवस्तू ही सहज अनुभवविषय होते. सहजता हा कीर्तनाचा आत्मा आहे, 'सहज बोलणें हितउपदेश करूनि सायास शिकविती' हे तुकारामांचे वचन या संदर्भात अर्थपूर्ण आहे. सहजता अनुभवाला नवा आशय देते. कीर्तनातल्या विवेचनाची सहजता मानवी मनाला आकृष्ट करते. या सहजतेला शुद्ध आचरणाची बैठक असल्यास कीर्तनाचे कीर्तनत्व मोलाचे ठरते. लोक बुवांच्या आपणहून पाया पडतात. कारण लोकदृष्ट्या बुवा हे कलावंत वा कलाकार नसून, ते 'हरिभक्तिपरायण' (ह. भ. प.) असतात. 'हरि' म्हणजे जयजय रामकृष्ण

हरी'. 'भक्ती' म्हणजे ईश्वराचे प्रति भाव. 'परायण' म्हणजे अनन्यनिष्ठ. यांमुळे ही 'हरिभक्तिपरायण' मंडळी चोवीस तास 'ह. भ. प.' असतात. म्हणजे हे कीर्तनानुभवात अखंड असतात. (हे सारे आदर्श कीर्तनकाराबद्दलचे विवेचन आहे.) समाज त्यांचा ऐहिक प्रपंच भागवतो. त्यांच्या आचारांत आणि विचारांत एकसंधपणा असतो. ईश्वराविषयी नितांत निष्ठा असते. निष्ठा म्हणजे अंतिम मूल्य, हे लोकशिक्षणाचे अधिष्ठान आहे. ते कीर्तनाने निर्माण होते.

'लोकशिक्षण' ही संकल्पना भारतीय संदर्भात तपासली पाहिजे. मुळात ही संकल्पना वर्तमानाशी संबद्ध आहे. ज्या शिक्षणात वर्तमान गतिप्रिय आहे, ते लोकशिक्षण. हे ऐहिकाशी आणि पारलौकिकाशीही निगडित आहे. हे कधीही जुनाट नसते. मुळात ते सनातन आहे. भारतीय परंपरा ही मूलतः आध्यात्मिक आहे. आध्यात्मिक याचा अर्थ जीवनदृष्टीची चिकित्सा करून, ते जाणीवपूर्वक जगून भावातीत होणे. काहींना हाच मोक्ष वाटतो. हे ज्ञान चित्तशुद्धीतून होते. मोक्ष म्हणजे स्वतःला ओळखणे. यातून अविचल निष्ठा निर्माण होते. ती अखेरपर्यंत जो पाळतो, तो आध्यात्मिक. हे ओळखून भारतीय समाजमनाशी ज्याने संवाद साधला, तो इथे टिकला. मुळात भारतीय मन संस्कारप्रधान. षोडश संस्कार जसे महत्त्वाचे, तसे त्या त्या प्रदेशातील निसर्गाने जी पृष्ठभूमी तयार करून दिली, तीतून संस्कार आले. हे विश्व मानवी जीवनाचा अविभाज्य भाग ठरले. ही दृष्टी स्वाभाविक दृष्टी ठरली. विश्व हे घर आहे. यात अखिलजन राहतात. या विश्वचक्रामुळें जीवनाची धारणा होते. त्यासाठी नित्य कर्मे आहेत. यातून समूहाची जीवनसरणी निर्माण झाली. ही जीवनसरणी बदलली, की पारंपरिक जीवनाकडे तटस्थ मनाने बघता आले. यामुळे समाजजीवनातील प्राकृतिक पर्यावरण हे जितके महत्त्वाचे ठरले, तितके सांस्कृतिक पर्यावरण महत्त्वाचे ठरले. याचे कारण माणसाचे जगणे हेच एक संपूर्ण सर्जन बनले. जगण्याला सर्जनशीलतेची डूब दिल्याने ते चैतन्यपूर्ण ठरले. यामुळे प्रत्येक वस्तूला व्यक्तिमत्त्व आले. वस्तूचे व त्याचे नाते निर्माण झाले. ते त्याने पुढच्या पिढीला दिले. यातून समाजजीवनाचा ढाचा तयार झाला. मात्र तो स्थिर नव्हता. समूह बदलता असल्याने त्याचा ढाचाही बदलता होता.

या साऱ्या सांस्कृतिक प्रक्रिया पक्क्या ध्यानात घेतल्या, तर 'लोकशिक्षणा'ची संकल्पना ध्यानात येईल. याचे कारण यातला जो 'लोक' आहे, त्याला सांस्कृतिक वास्तवाचे आकलन आहे. या समूहातल्या विश्वाचे भान आहे. हे भावविश्व ज्या एका

भावनाप्रक्रियेने भारलेले असते, त्याचा आविष्कार गतिमान असतो. अशा या घटितांच्या प्रवाहातून बनलेले लोकजीवन समजावून घेतले, तर ते ज्या भारतीय मुशीतून आले आहे, ती मूस कीर्तन, प्रवचन, भजन, पठन यांची आहे. विस्तारभयास्तव यावर अधिक भाष्य करीत नाही. लोकशिक्षणाची ही पृष्ठभूमी अभ्यासली, की कीर्तन हे एक महत्त्वाचे अंग आहे, हे जाणवेल.

वारकरी कीर्तनास 'निरूपण' अशी दुसरी संज्ञा आहे. मूळ माळकरी वारकरी हा 'आज गु. सोनुमामांचे निरूपण आहे' असे म्हणतो. निरूपण म्हणजे केवळ सांगणे नव्हे. 'ते' होऊन सांगणे आणि सांगता सांगता अनुभवाने नवीन होणे याला 'निरूपण' म्हणतात. ज्या काळात पुस्तकांचा प्रसार नव्हता किंवा छापील पुस्तके नव्हती, त्या काळात निरूपण महत्त्वाचे होते. यातला निरूपक हा प्रभावी घटक होता. तो मधोमध उभा राही. त्याच्या डाव्या हाताला पखवाज (यामुळे निरूपणाला लय येते.) होता. शेजारी वीणेकरी होता. वीणेवर अखंड हरिनामस्मरण एका वेळी; तर त्याच वेळी निरूपक किंवा बुवा सुरावर निरूपण करण्यासाठी वीणा होती. त्याच्या बाजूला अर्धचंद्राकृती टाळकरी होते. टाळकरी किमान तेरा नि कमाल शेकड्यापर्यंत होते, वारकरी टाळ पितळी. खोलगट, वर्तुळाकार. शब्दासह जोर देण्यासाठी खोलगट भागात दाबून आघात करून, दुसऱ्या शब्दावर पहिला शब्द ऐकण्यासाठी कडेला दुसरा आवाज केला, की अभंगाचा चरण उचलला जातो. हा चरण कानांवर आला, की त्याची लय मनात घुमते. ती श्वासोच्छ्वासाइतकी स्वाभाविक असते. यातून अभंगातली अक्षरे मुखात बसायला लागतात. अभंगातल्या प्रत्येक चरणातल्या उतारीने त्या चरणाचा पूर्णविराम होतो. तो चरण पुनरावृत्त होतो. यातून शब्दावृत्ती होते. पारंपरिक भजनी धुमाळीतून तो चरण पुनरावर्तनाने श्रोत्यांच्या मुखांत बसून श्रोते बुवांबरोबर म्हणू लागतात. बुवांच्या पाठीमागे दोन मुख्य टाळकरी उभे असतात. बुवा त्यांना चरण म्हणायला सांगतात. आधी ते म्हणतात. त्यांच्या पाठोपाठ बाकीचे टाळकरी म्हणतात. टाळकऱ्यांबरोबर श्रोतेही सहभागी होतात. तेही म्हणू लागतात. प्रत्येक चरणाला तोड उचलली, की नवा चरण सुरू होतो. तो पुन्हा मूळ चरणाशी जोडला जातो. यातून अक्षरओळख होते. शब्दांचे उच्चारशास्त्र समजते. शब्दांचे साहचर्य किती स्वाभाविक आहे, हे समजते. शब्दांमधली ध्वनिप्रक्रिया पखवाजाच्या व टाळेच्या सुमेळातून लोकांना समजते. अभंगातला कोणता चरण महत्त्वाचा आहे, हे बुवा ठाय लयीतून द्रुत लयीत येताना सुचवितात. हा चरण द्रुत लयीत ते उचलतात. मग जो चरण महत्त्वाचा असेल, तो

तीनदा आवृत्त करतात. तो प्रत्येक चरणाशी जोडून म्हणतात. शेवटचा चरण पाच ते सहा वेळा टाळकरी गातात. तोपर्यंत बुवा उपास्यदैवताचे स्मरण करतात. मग सर्व मिळून अभंगाचे ध्रुवपद गातात.

वारकरी कीर्तनाचा प्रयोग पुढील आकृतीतून दिसतो.




ही आकृती मुद्दाम यथामती काढली आहे. याचा संबंध लोकशिक्षणाशी आहे. लोकांना जे सांगायचे आहे, त्याची पृष्ठभूमी भारित करावी लागते. वारकरी कीर्तन वाळवंटात असे. कोणत्याही सांसारिक विषयाचे बी वाळूत रुजत नाही, म्हणून वाळवंटात कीर्तनाची प्रथा होती. आजही वारकरी नामसप्ताह वाळवंटात नदीकाठी होतात. काही देवळात वा रस्त्यावर मंडप घालून होतात. या साऱ्यांचे उपास्यदैवत एक असते - ते पांडुरंग. ते बुवा समोर ठेवतात. उपास्यदैवतापासून दहा पावले बुवा अंतर राखून कीर्तनास उभे राहतात. याला 'कीर्तनाची गादी' म्हणण्याचा प्रघात आहे.

बुवांच्या डाव्या हाताला वीणेकरी असतो. थोड्या अंतरावर पखवाजी असतो. पाठीशी दोन मुख्य फडकरी तसे टाळकरी असतात. यांच्या बरोबरीला बाकीचे टाळकरी असतात. यातून लोकशिक्षणास सुयोग्य पार्श्वभूमी तयार होते.

बुवांचा पोशाख पांढरा स्वच्छ असतो. धोतर; लांब बाह्यांचा सदरा; त्यावर उपरणे व किमान सात हाती फेटा असतो. कपाळी उभे वैष्णवी गंध. मधोमध

अष्टगंधाचा व काळ्या बुक्क्याचा टिळा असतो. हे या लोकशिक्षणाचे प्रवेशपत्र असते. गळ्यात तुळशीची माळ म्हणजे अखंड व्यवधान. दोन्ही गालांवर वैष्णवी मुद्रा म्हणजे तो प्रमाणित श्रोता.

प्रसन्न व्यक्तिमत्त्व हे शिक्षणग्रहणाचे अधिष्ठान म्हणून उपास्यदैवताची प्रतिमा बुवा समोर ठेवतात. बुवांच्या डाव्या हाताला पुरुषश्रोता व उजव्या हाताला स्त्रीश्रोता. निरूपणाला हे अनुकूल असते. निरूपक डावीकडून उजवीकडे नैसर्गिकरीत्या दृष्टिक्षेप टाकीत निरूपण सहजतेने करू शकतो.

निरूपणास येणारा श्रोता सर्रास भाविक असतो. परंतु तो बहुजन वर्गातला असतो. यात नागर, अभिजन व ग्रामजन यांची सरमिसळ असते. तथापि, बहुजन समाजातले लोक अधिक असतात. यांत आबालवृद्ध असतात. पणजोबा, पणतू; आजी-नात अशा चार-चार किंवा तीन-तीन पिढ्या एका बैठकीवर निरूपणास बसतात. म्हणजे येथे समान पातळीवर असतात. येथे श्रेणिक आसन व्यवस्था नसते. बसण्याचे आरक्षण नसते. मात्र वयस्कर वा अधिकारी (या क्षेत्रातील, व्यक्तीला बुवांपाशी सन्मानाने बसवितात. 'विठ्ठल विठ्ठल' या भजनाने त्याचे स्वागत करतात. कुणाविषयी कसा आदर बाळगावा, याचे शिक्षण इथे किती स्वाभाविकपणाने मिळते! मुळात कीर्तनास येणारा श्रोता सश्रद्ध मनाने येतो. त्याच्या सश्रद्ध मनातल्या जाणिवा डोळस करण्याचे कार्य वारकरी कीर्तन करते. त्याच्यातल्या नामीला व त्याच्या मुखातल्या नामाला नेमका आकार इथे मिळतो. सर्वांना नामभक्तीच्या माहात्म्यातून समाजजीवनातली शुचिता ग्रहण करावयाची असते. वारकऱ्याने कीर्तन हे ऐकलेच पाहिजे व केले पाहिजे, या दंडकाचा हा अर्थ आहे.

'जय जय रामकृष्णहरी' या बीजमंत्राने बुवा गळ्यात वीणा घेऊन आरंभ करतात. ठाय भजनीधुमाळीतून हे म्हणता म्हणता अतिद्रुतापर्यंत जाते. पखवाजाच्या घुमदार लयीत कीर्तनभूमी मंत्रभारित होते. आसपासच्या लौकिकाचा विसर पडतो. भजन संपल्यावर नमन म्हणून बुवा 'रूप पाहता लोचनी! सुख जाले, वो, साजणी' हा ज्ञानदेवांचा व 'सुंदर ते ध्यान' हा तुकोबारायांचा अभंग म्हणतात. यामुळे निरूपणाला भक्कम पृष्ठभूमी मिळते. मग पुन्हा भजन (विठ्ठल विठ्ठल) हे होते. 'पुंडलिका वरदे हरी विठ्ठल', 'श्री ज्ञानदेव तुकाराम'! पंढरीनाथ महाराज की जय' असा जयजयकार होतो.

मग बुवा निरूपणास अभंग घेतात. अभंग बहुधा तुकारामांचा असतो. (बाकी

वारकरी संतांचेही अभंग घेतात.) बुवा चरण म्हणतात. त्यापाठोपाठ मुख्य टाळकरी; त्या पाठोपाठ बाकीचे टाळकरी म्हणतात. एक चरण तीनदा आवृत्त होतो. ते सर्व श्रोते म्हणतात. यातून अभंग मुखात बसतो. सर्वसाधारण चार चरणी अभंग असतो. भक्तिपर; नामपर; उपदेशपर असतो. यात कधी चार चरण मिळून एक कडवे होते. तर कधी दोन चरण मिळून एक कडवे होते. अभंग पूर्ण झाल्यावर भजन होते. मग बुवा गळ्यातला वीणा वीणेकऱ्यास नमस्कार करून देतात. पुन्हा अभंग होतो. त्या पाठोपाठ भजन होते. मग बुवा श्रोत्यांशी सलगी करीत करीत निरूपण करतात.

निरूपणात बुवा वक्ते असले, तरी हा संवाद एकतर्फी नसतो. तो दुतर्फी असतो. बुवा--श्रोते, श्रोते--बुवा. असेही या निरूपणाचे रूप असते. बुवा लोकभाषेतून हे बोलतात. येथे ते प्रामुख्याने बोलत नाहीत. सांगतात. बोलणे हे एकतर्फी असते. सांगणे दुतर्फी असते. यात श्रोत्याच्या प्रतिसाद मुख्यत्वे विचारात घेतला जातो. श्रोत्याने प्रतिसाद द्यावा, म्हणून बुवा श्रोत्यांना आदरार्थी संबोधने वापरतात. सांगण्यातून निरूपण अधिक खुलते. ते श्रोतृमनास भिडते. जे भिडते, ते मनात पक्के ठसते, हा लोकशिक्षणाचा केंद्रबिंदू आहे. सांगता सांगता मुखात बसते. यात बुवा कधी कधी श्रोत्याच्या रूपातून, तर कधी वक्त्याच्या रूपातून उभे राहतात. बुवांची ही भाषा अतिशय सहज, पण सूचक; अतिशय साधी, पण मार्मिक; अत्यंत स्वाभाविक, पण वेगळी अशी असते. कितीतरी वेळा असे वाटते, की अमुक एखादा शब्द माहीत होता. पण ते ठाऊक नव्हता. बुवा त्यांच्या निरूपणातून त्या शब्दाच्या अंतरंगाचा ठाव घेऊन जेव्हा सांगतात. तेव्हा तेच शब्द नवीन वाटतात. त्यांच्यांतली सार्थ व्यंजना आनंद देते.

वारकरी कीर्तनपरंपरेत विष्णुबुवा जोगमहाराज; सोनोपंत दांडेकर; धुंडामहाराज देगलूरकर; वासकरमहाराज; शंकरमहाराज कंधारकर; देहूकरमहाराज अशी दिग्गज मंडळी आहेत. यांच्या प्रत्येकाच्या निरूपणाची स्वतंत्र शैली आहे. यांतला एकेक निरूपणकार स्वतंत्र निबंधाचा विषय आहे. भाषा केवढी गर्भश्रीमंत आणि बव्हर्थप्रसव असते, ते यांच्या निरूपणातून समजते. यांची निरूपणे ऐकून केवढी मोठी वारकरी कीर्तनपरंपरा निर्माण झाली आहे! ज्याला भाषा किंवा भाषिक जीवन खरोखर समजून घ्यायचे असेल, त्याने एक चातुर्मास पंढरपुरात घालवावा किंवा एखादा नामसप्ताह अभ्यासावा. निरक्षरही किती नेमकेपणाने व प्रसंगोचित बोलतात, याचे वस्तुपाठ या कीर्तनपरंपरेत अभ्यासावयास मिळतात. अस्तु.

ह. भ. प. सोनोपंत दांडेकरांच्या 'हेचि थोर भक्ति आवडते देवा! संकल्पावी माया'





अनुक्रमणिका

या अभंगातील निरूपणाचा पुढील परिच्छेद बघा :

"संतश्रेष्ठ तुकाराममहाराज म्हणतातः हेचि थोर भक्ति आवडते देवा! यात तुकाराममहाराज 'च' वर भर देऊन सांगतात, की देवाला आवडणारी थोर म्हणजे मोठी भक्ती हीच. म्हणजे कोणती? हे ते या कडव्याच्या उत्तरार्धात सांगतात -

'संकल्पावी माया। संसाराची.' (सुरावर - पुन्हा हा चरण.) संकल्पिणे? म्हंजे काय? संकल्पिणे म्हंजे अर्पण करणे. माया म्हणजे प्रेम. आसक्ती. ऐका! ऐका! संसारावरली आसक्ती देवाला अर्पण करणे हीच देवाची मोठी सेवा आहे. शब्द नीट लक्षात घ्या! संसार टाकणं ही देवाची सेवा आहे, असं महाराज म्हणत नाहीत. संसारावरचं प्रेम अर्पण करणं ही सेवा आहे, असं महाराज म्हणतात." ५

मधेच 'विठ्ठल विठ्ठल' भजन होते.

इथे एक सूत्र पूर्ण झाल्याची खूण, म्हणजे भजन.

पुन्हा सोनोपंत सांगतात :

"आता तुम्ही म्हणाल. बुवा; संसारावरलं प्रेम देवाला दिलं, तर संसार चालायचा कसा? साखर व रवा यांचा तुपामुळं एकजीव होऊन लाडू बनतो, तशी भिन्न स्वभावांची माणसं एकत्र येऊन संसार करतात. याचं उत्तर महाराज पुढल्या कडव्यात देतात . . . "

असे सोनोपंत एका मुद्द्यातून दुसरा; दुसऱ्यातून तिसरा सांगतात. यात ज्ञानेश्वरी; भागवत; गाथ्यातली वचने येतात. सोनोपंतांचा पाश्चात्त्य तत्त्वज्ञानांचा उत्तम अभ्यास असल्याने शिक्षित श्रोत्यांमध्ये हेही संदर्भ येतात. खेड्यापाड्यांमधल्या कीर्तनात अधिकाधिक कृषिक्षेत्राशी संबंधित दृष्टांत निरूपणात पेरतात. जाता जाता सोनोपंत नेमके सांगतात. पाहा :

"तुकोनि घेतली 'मोतिये' जैसी. शब्द वापरायचे, ते मोत्यांच्या मापानं. गाजराचं माप वेगळं. मोत्यांचं माप वेगळं. गाजर मोजताना माप कलंडलं, तरी बिघडत नाही. पण मोत्यांचं मोल दाण्याच्या तेजावर असतं. त्याचं वजन चवानं मोजलं जातं. तसं या श्रेष्ठांच्या शब्दांचं आहे. त्यांचे शब्द सतेज! मौल्यवान! इतकंच नव्हे; ज्या त्या जागी योग्य तोच व जरूर तेवढ्याच वजनाचा शब्द ते वापरतात . . ." ६

यातला औचित्यविचार लक्षात घेण्याजोगा आहे. याबरोबर वेदांतदर्शनाची चर्चा येते. दृष्टांत येतात. संपूर्ण निरूपणाला भावासकट वेगळा रूपबंध येतो.

धुंडामहाराज देगलूरकरांनी 'कैवल्याचा पुतळा। प्रगटला भूतळा। चैतन्याचा





अनुक्रमणिका

जिव्हाळा। ज्ञानोबा माझा' या नाथांच्या अभंगावर अप्रतिम निरूपण केले आहे. ते 'श्री ज्ञानेश्वरीसेवा-गौरव ग्रंथ' यात समाविष्ट केले आहे. ते सारे मुळातून वाचण्याजोगे आहे.[७] महाराजांची निरूपणशैली प्रासादिक; पण भेदक. दार्शनिक; पण भावार्द्र. सूक्ष्म पण व्यावहारिक. यामुळे निरूपणाला वेगळेपण येते.

"कैवल्याचा पुतळा। प्रगटला भूतळा। चैतन्याचा जिव्हाळा। ज्ञानोबा माझा॥. . . नाथांनी ज्ञानदेवांचं वर्णन कसं योग्य केलं पाहा. काय आहे! बद्धाला बद्धच आवडतो; मुक्त आवडत नाही. मुक्तालाच मुक्त आवडतो. . .

एक गृहस्थ आमच्यांबरोबर प्रवासाला निघाले. पण त्यांची पानतंबाखूची चंची विसरून आले. त्यांना वाटलं, महाराजांजवळ सगळी सोय असेल. पण आमच्याजवळ फक्त ज्ञानेश्वरी. त्यांना आम्ही कसे आवडणार? 'समानशीलेषु व्यसनेषु सख्यम्' ही म्हण प्रसिद्ध आहे. नाथमहाराजांना ही माउली का आवडते? ते मुक्त होते, म्हणून? त्यांना मुक्त म्हणणंही शक्य नाही. कारण मुक्त म्हणणं, म्हणजे ते कधीतरी बद्ध होते, असं म्हणणं. एखाद्याला विचारलं 'विडी कधी सोडली?' याचा अर्थ पूर्वी ते पीत होते. हो, की नाही? तो म्हणेल; 'मी विडीला कधी शिवलोच नाही; तर सोडण्याचा प्रश्नच नाही'. त्याप्रमाणं मुक्तत्व कबूल करणं म्हणजे बद्धत्वाचीही कबुली देणं. खऱ्या स्वरूपस्थितीत बद्धमुक्त यांची योग्यता समान आहे. म्हणून कैवल्याचा पुतळा. कैवल्य म्हणजे केवलत्व. असंगत्व. निरुपाधिकत्व. इथं कैवल्य अवस्थावाचक नाही; स्वरूपवाचक आहे . . ."

साध्या दृष्टांतातून वेदांतप्रतिपादनाचे सार सूचित होते. यातून वागावे कसे, हे कळते. व्यसनाधीनतेचा संदर्भ येतो. महाराजांना याचा स्पर्शही नाही, हेही सार्वत्रिक सत्य स्पष्ट होते. महाराजांनी वारकरी कीर्तनाच्या गादीवर कसे वागावे, तेही यातून सुचविले जाते. बद्ध-मुक्त वेदांतातल्या अवघड संकल्पना व्यावहारिक दृष्टांताच्या साधनातून सोप्या होतात. तत्त्वज्ञानाच्या सांकल्पनिक व्यूहापेक्षा लोकभाषेचा व्यूह उपयोगी पडतो, तो असा. प्रत्येकाला वाटते, महाराज फक्त आपल्यालाच सांगताहेत. तरीही ते सर्वांना सांगतात. सर्वांशी आपलेपणातून सांगतात. यातले चैतन्य श्रोतृमनात घर करते. हा जिवंतपणा आत्म्याशी एकत्व पावतो. म्हणून कीर्तन हे आजही जनसामान्याला आपले वाटते, ते यामुळे. इतर माध्यमे तांत्रिक आणि निर्जीव किंवा दूरजीवी आहेत. परंतु कीर्तन हे चैतन्यदायी प्रभावी माध्यम असल्याने त्याचा जीव-जीवाचा संवाद शिव-शक्तिसंवादापर्यंत भिडतो. यातून जे समाजाला मिळते, ते

सामाजिक संस्कार उत्तम निर्माण करणारे ठरते.

सहज आठवले. (तसे खूप आठवतेय्. पण आवरते घ्यायलाच हवे) अमृतानुभवासारखा जबरदस्त विषय. पण तो महाराजांनी 'अनुभवे आले अंगा। ते या जगा देतसे' या तुकारामांच्या अभंगनिरूपणात इतका चपखल बसविला, की थक्कच झालो. महाराज निरूपणात म्हणाले :

"संसार . . . संसार म्हंजे काय? ऐका! अवधान द्या! संसार म्हंजे अनुभवांचा समुच्चय. ज्ञानं दोनच. एक अनुभव. दुसरी स्मृती. केवढी जरी स्मृती झाली, तरी तिला अनुभवांची बरोबरी येत नाही. पृथ्वी आहे. जमीन आहे. पाऊस पडला, तरी पेरावं लागतं. ते अनुभव घ्यावे लागतात.[८] त्याच्याकरता काही प्रयत्न आहेत. पण काही अनुभव सहज आहेत. तो अनुभव. तो नित्य. तो विशेष आहे. म्हणून त्याला मूल्य आहे. सारेगमपधनीसा आपल्याही गळ्यातनं निघतात. बाथरूम सिंगर सगळेच असतात. पण चांगल्या गाणारालाच आपण मूल्य देतो. कारण काय? अनुभव. तोही मौल्यवान. तसा हा ज्ञानोबारायांचा अमृतानुभव तुकोबांच्या शब्दांत . . ."

यावरून लोकशिक्षणाचा भावार्थ कीर्तनातून स्पष्ट होतो. भाषा, भाव, संस्कृती ही त्रयी समाजजीवन समृद्ध करते. याचे अधिष्ठान सदाचरणी व प्रयत्नवादी समाज असतो. हे कीर्तनातून लाभते. मधेमधे होणाऱ्या नामगजरातून विषयाचे प्रतिपाद्य लोकमनावर नीट ठसले, की नाही, याची बुवांनी घेतलेली ती चाचणी असते.

पूर्वरंगानंतरच्या भजनात श्रोत्यांना किंचित विश्रांती असते. पुढच्या विवेचनाला सक्षम राहण्याची ती सूचना असते. एखादा वेदांतनिरूपणात समाधिअवस्थेत डोलू लागला, की बुवा पखवाज्याकडे दृष्टी टाकून जोरजोरात विठ्ठलाचे भजन करतात. यामुळे तोही सावध होतो. पूर्वरंगनिरूपणाचा विस्तार उत्तररंगात होतो. रामायण; महाभारत; भागवतातल्या कथा विवेचनापुरत्या येतात. संतचरित्रातील किंवा भक्तचरित्रातील प्रसंग येतात. हे सारे प्रतिपाद्य स्पष्ट ठसावे, या हेतूने निरूपणात येतात. भारुडातले नाट्य येते. गोपाळकाल्यातले खेळ येतात. (काल्याचे कीर्तन हा एक स्वतंत्र सघन 'अनुभव' आहे.[९]) गौळणीतले भावनृत्य येते. हिंदु-तुर्कसंवादांसारखे वैश्विक संवाद येतात. सासू-सून; सासरा-जावई; भाऊ-बहीण; पति-पत्नी ही संसारातली द्वंद्वे दृष्टांतरूपाने श्रोत्यांना मुक्तपणे हसवितात. कान्होपात्रा; सोयराबाई; जनाई; मुक्ताईच्या भावव्याकुळतेने श्रोत्यांना रडवितात. यातून सदाचरण; सत्य; वैराग्य; ज्ञान; अभ्यास ही जीवनोपयोगी मूल्ये सहजपणे मनावर बिंबतात.

गाडगेमहाराजांनी कीर्तनांद्वारा गावेच्या गावे व्यसनमुक्त केली. सोनोपंतांनी दलित वस्त्यांतून हरिनामसप्ताह सुरू केले. धुंडामहाराजांनी गोरगरिबांच्या आत्मोद्धारासाठी आयुष्य वेचले. जे काम राष्ट्रीय एकात्मतेच्या पत्रकांनीही झाले नाही, ते काम डॉ. दत्तोपंत पटवर्धनबुवांनी जोगमहाराजांपाशी कीर्तनाचे पाठ घेऊन राष्ट्रीय कीर्तनांतून कितीतरी आधुनिक विद्याविभूषितांना स्वातंत्र्यसंग्रामात झोकून देण्याची प्रेरणा दिली.

यापेक्षा लोकशिक्षणाचे आणखी कार्य ते कोणते?

आत्मिक बल वाढायला लागले, की माणसातला पुरुषार्थ टिकतो. अशी माणसे सांस्कृतिक संचिते असतात. विशुद्ध ज्ञानाच्या; कर्माच्या; भक्तीच्या बळावर समग्र जीवननिष्ठा आणि समाजनिष्ठा ज्या उत्कट जाणिवेने कार्यरत झाली, ते सारे श्रेय कीर्तनाने दिलेल्या लोकशिक्षणाच्या व्यापक दृष्टीस आहे. 'भूतां परस्परे जडो। मैत्र जीवाचे' हे पसायदान दिले. शेवटी 'हेचि दान देगा, देवा' च्या रूपाने नवा प्रकाश मागितला. आजच्या तांत्रिक वास्तवात हा जिवंत आत्मप्रकाश नाहीसा होतोय्. म्हणून भाषा आणि संस्कृती विकट झालीय्. आजही असे उत्तम कीर्तन हवेय्. आजही हा नवा पुरुषार्थ हवाय्.

**संदर्भ**


१. V. S. Apte's Practical Sanskrit Dictionary (कोशात मुद्रणदोषाने कृत् ऐवजी कत् पडले आहे.)

२. सरस्वती शब्दकोश.

३. मोल्सवर्थ डिक्शनरी.

४. नाचू कीर्तनाचे रंगी : डॉ. यशवंत पाठक. आ. १, पृ. ८, ९.

५. अभंगसंकीर्तन : शं. वा. दांडेकर, आ. ३, पृ. ६. ७.

६. अभंगसंकीर्तन : शं. वा. दांडेकर, आ. ३, पृ. ८.

७. ह. भ. प. धुंडामहाराज देगलूरकर, श्रीज्ञानेश्वरीसेवा गौरवग्रंथ : संपा. बळवंत गिरिराज घाटे व मधुकर दत्तात्रय जोशी, आ. १, पृ ४ ते २२

८. अमृतानुभव-प्रवचने : ह. भ. प. धुंडामहाराज देगलूरकर, आ. १, पृ. ९।१०

९. अभंगनिरूपण भाग २ : धुंडामहाराज देगलूरकर, आ. १, पृ. १९२.



**मनमाड महाविद्यालय, मनमाड ४२३१०४**







अनुक्रमणिका

# 'लोकशिक्षण' मासिके : एक नोंद

सुजाता शेणई

'लोकशिक्षण' म्हणा (किंवा 'जनशिक्षण' म्हणा किंवा 'समाजशिक्षण' म्हणा) अशी संज्ञा संस्कृत, हिंदी, किंवा मराठी शब्दकोशातून आढळत नाही. संज्ञा जाऊ दे; त्याच्यामागची संकल्पना कुठून आली? पूर्वी शिक्षणखात्याला 'डिपार्ट्मेंट ऑव्ह पब्लिक इन्स्ट्रक्शन' म्हणत, पण त्याचा अर्थ लोकशिक्षणाशी संबंधित नसून सार्वत्रिक औपचारिक शिक्षणाशी संबंधित आहे. किंबहुना 'लोकशिक्षण' याला इंग्रजीत प्रतिशब्द चटकन सुचत नाही. (कदाचित याचमुळे आपल्या परभृत विद्वानांना हा आजवर चर्चा करण्यासारखा महत्त्वाचा विषय वाटलेला दिसत नाही!) मराठी परंपरेत मागे जावे, तर रामदासांचे 'जें जें आपणांसि ठावें ते तें दुसऱ्यासि शिकवावें। शहाणे करूनि सोडावे सकळ जन' हे बोल आठवतात, आणि मग अव्वल इंग्रजीच्या काळामधले प्रयत्न आठवू लागतात.

इंग्रजी अंमल १८१८ मध्ये महाराष्ट्रात आला आणि 'काळ व पदार्थाची स्थिती बदलली, म्हणजे जुन्या रीती सोडून नव्या घेण्याचे प्रयोजन पडते', ही जाणीव झाली. बाळशास्त्री जांभेकर यांच्या 'दर्पण' (१८३२) पासून नियतकालिकांची एक नवी परंपराच सुरू झाली. 'ज्ञानोदय', 'मराठी ज्ञानप्रसारक,' 'दिग्दर्शन', 'विविधज्ञानविस्तार', 'बाळबोध' ही नियतकालिकांची नावेच काही सुचवून जातात. (एका वृत्तपत्राचे नावही 'ज्ञानप्रकाश' होते.) सर्वसामान्य साक्षर लोकांचे ज्ञानप्रसाराद्वारा कल्याण साधणे हे एक समान सूत्र या परंपरेमागे आहे.

याच परंपरेमधली 'लोकशिक्षण' (जुने) आणि 'लोकशिक्षण' (नवे) ही मासिके. दुसरे मासिक तसे स्वतंत्र, पण पहिल्या मासिकाला अभिवादन करून काढलेले. तिसरेही एक मासिक नंतर याच नावाने निघाले.

'लोकशिक्षण' जुने : जनार्दन विनायक ओक (१=१ पासून ६ ५ - ६ पर्यंत), जनार्दन सखाराम करंदीकर ( ६ : ७ - ८ पासून ७=५ - ६ पर्यंत). प्रकाशनस्थळ : तळेगाव दाभाडे (१=१ पासून ३=३ पर्यंत), पुणे (३=७ पासून ७=५ - ६ पर्यंत). प्रकाशनकाळ : आश्विन, १८३४ ते फाल्गुन, १८४० (१९१२

ते १९१९)

'लोकशिक्षण' नवे : संपादक : गणेश गंगाधर जांभेकर (१=१ पासून ११=१० पर्यंत) प्रकाशनस्थळ पुणे. प्रकाशनकाळ : जानेवारी, १९२८ (१=१) पासून डिसेंबर, १९३२ (५=१२) पर्यंत, मध्ये खंड, जुलै, १९३५ (६=१) पासून जून, १९४१ (११:१२) पर्यंत. (मधला खंड हा तीव्र आर्थिक अडचणींमुळे पडला.) वर्ष ५ पासून मासिकाला एका 'लघुग्रंथमाले' ची जोड देण्याचा प्रयत्न कमी-अधिक सातत्याने झाला.

'लोकशिक्षण' तिसरे : संपादक : बा. ग. जगताप आणि इतर. प्रकाशनस्थळः पुणे (महाराष्ट्र लोकशिक्षण समिती). प्रकाशनकाळ ऑक्टोबर, १९४८ (१:१) पासून, नंतर केव्हातरी बंद पडले.

पहिल्या 'लोकशिक्षण' मासिकाचे ब्रीदवाक्य पाहिल्यास, ते काढण्यामागची प्रेरणा कळू शकते.

जावी तामस सर्व बुद्धि विलया व्हावी पुरीं जागृती
ज्ञाना सर्वहि पूर्वजीं मिळविल्या राखोनि हो सत्कृती
अन्यांना बघुनी सदुद्यमरतां लागो बरी ती दिशा
देऊं निर्मल लोकशिक्षण असे विश्वेश देवो यशा

बहुधा 'लोकशिक्षण' संज्ञेचा हाच पहिला उपयोग असावा. दुसऱ्या 'लोकशिक्षण' चे ब्रीदवाक्य 'सा विद्या या विमुक्तये' (विष्णुपुराण २:३) हे आहे - अर्थात मूळचा 'अध्यात्मविद्या' हा अर्थ इथे व्यापक करून घेतलेला दिसतो. (गांधीजीप्रणीत अहमदाबादच्या राष्ट्रीय गुजरात विद्यापीठाचे हेच •बोधवचन होते.) तिसऱ्या 'लोकशिक्षण' ने 'असाध्य ते साध्य करिता सायास। कारण अभ्यास तुका म्हणे' हे ब्रीदवाक्य निवडले आहे. इथेही 'अभ्यास'चा अर्थ बदलून घेतला आहे.

एक लक्षात घेण्याजोगी गोष्ट म्हणजे, 'करमणूक', 'लोकरंजक', 'लोकरंजन', मासिक मनोरंजन' अशा नावांची नियतकालिकेही एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात आणि विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात महाराष्ट्रात निघालेली दिसतात. त्यांच्यामागची प्रेरणा काहीशी वेगळी आहे, हे उघड आहे. मात्र त्यांमध्ये ललित वाङ्मयाला प्राधान्य दिलेले असले, तरी लोकशिक्षणाच्या प्रेरणेपासून ती पूर्णपणे दूर आहेत, असे दिसत नाही.

पहिल्या 'लोकशिक्षण' चे संस्थापक ज. वि. ओक (१८०९-१९१७) यांनी फर्ग्सन महाविद्यालय, (पुणे), सिटी हायस्कूल, (नागपूर), राष्ट्रीय शिक्षण संस्थेचे समर्थ विद्यालय, (तळेगाव दाभाडे) इथे काम केले आणि नंतर मृत्यूपर्यंत 'लोकशिक्षण' चे संपादन केले. नंतर त्यांचे मित्र ज. स. करंदीकर (१८७५ - १९५९) केसरी संस्थेत काम करत होते. त्यांनी काही वर्षे ते चालवले. ओक म्हणतात (१:१) :

'आमचे मासिक दूरवर्ती गुरुशिष्यांचे विद्यालयच व्हावे, हा आमचा हेतू आहे.' (न्यायमूर्ती रानडयांची पुण्याच्या वसंत व्याख्यानमालेमागची भूमिका आणि इंग्लंडमध्ये काही दशकांपूर्वी सुरू होऊन जगभर पसरलेली मुक्तविद्यापीठांची चळवळ यांची इथे आठवण व्हावी.) ते पुढे म्हणतात : 'प्रचलित राजकारण आणि निवळ मनोरंजन हे विषय आम्ही जाणूनबुजून वगळले आहेत. परंतु काही विषयांत जर राजकारण अपरिहार्य असेल, तर ते विषय आम्ही समाविष्ट करू. ' श्री. व्यं. केतकर, ना. गो. चापेकर, वा. म. जोशी, द. वा. पोतदार, ल. ग. खरे, ग. रं. दंडवते, इत्यादी लेखक आणि साहित्यशास्त्र, शिक्षण, आरोग्य, धर्मचर्चा, चरित्र, बीजगणित, अर्थकारण यांसारख्या विषयांवर लेख वा लेखमाला या मासिकात येऊन गेलेली दिसतात.

दुसऱ्या 'लोकशिक्षण' चे आवाहन पहिल्याप्रमाणे मध्यमवर्गीयांनाच आहे, लेखिकांचा जवळपास अभाव येथेही जाणवतो. भारताच्या स्वातंत्र्य-चळवळीचे राष्ट्रीय शिक्षण हे एक महत्त्वाचे अंग. तीच प्रेरणा इथेही दिसते. ग. गं. जांभेकर हे 'दर्पण'-कार जांभेकरांच्या कुळातलेच. राष्ट्रीय विद्यालय, (अमळनेर) इथे अध्यापन केल्यानंतर ते पुण्यात आले आणि मोठ्या जिद्दीने त्यांनी हे मासिक चालवले. ते म्हणतात (१=१) : 'आपण ज्या ऐतिहासिक, सामाजिक, धार्मिक, शैक्षणिक, आर्थिक व औद्योगिक परिस्थितीत सांप्रत गुरफटलेले आहोत, त्या परिस्थितीचे वास्तविक स्वरूप काय आहे, ती सुधारण्याची दिशा व मार्ग कोणते, तदर्थ आपल्या देशात प्रयत्न होत आहेत व झाले पाहिजेत, त्याची सोपपत्तिक चर्चा करण्याचा व तदनुसार लोकांत यथाशक्ती जागृती उत्पन्न त्यांस सत्कार्यप्रवृत्त करण्याचा हा एक अत्यंत नम्र असा प्रयत्न आहे.' पहिल्याच्या तुलनेत यात मजकूर अधिक प्रमाणात आहे, ग्रंथपरीक्षणावर अधिक भर आहे. ना. गो. चापेकर, वा. म. जोशी, शं. द. जावडेकर, ध. रा. गाडगीळ, के. ल. दप्तरी, अ. स. आळतेकर, शं. के. कानेटकर, द. गो. कर्वे, ना. ग. गोरे, श्री. ना. बनहट्टी, के. नारायण काळे, वा. य. कोल्हटकर, इत्यादी लेखक आणि इतिहास, राजकारण,

अर्थकारण, शिक्षण, साहित्यचर्चा, समाजकारण, व्याकरण, आरोग्य, शेती, युद्धशास्त्र यांसारख्या विषयांवर लेख वा लेखमाला या मासिकात येऊन गेलेली दिसतात. मूळ मराठीमधील किंवा अनुवादित ललित वाङ्मयाची जाणवण्याजोगी उपस्थिती इथे आहे; यशवंत, गिरीश, वि. द. घाटे, पर्ल बक, माक्सिम गोर्की, इत्यादी मंडळी हजेरी लावून गेलेली आहेत. केतकर, माधव ज्यूलियन, कालिदास, साहित्यसंमेलन, रसायनशास्त्र, हिंदुस्थानचा आर्थिक इतिहास यासारख्या विषयांवरील विशेषांक किंवा लघुग्रंथ आणि 'आजचा इतिहास' सारखी सदरे या मासिकाची वैशिष्ट्ये ठरतील.

दुसरे महायुद्ध आणि स्वातंत्र्यप्राप्ती यांच्यानंतर निघालेल्या तिसऱ्या 'लोकशिक्षण' चे सामाजिक आवाहन साहजिकपणे अधिक व्यापक आहे. गुरुवर्य जगताप संपादनसमितिप्रमुख असल्यामुळे शिक्षण विषयावर भर आहे. (उदाहरणार्थ, अभ्यासक्रम या विषयावर एक विशेषांक निघाला होता.)

पहिले, दुसरे, आणि तिसरे 'लोकशिक्षण' यांची तुलना करता लोकशिक्षणाची संकल्पना कशी बदलत गेली, हेही लक्षात येते.

**गारमाळ, ९, चाकणकर चाळ, वडगाव, धायरी, पुणे.**

# ‘हिंदु पंच’द्वारा लोकांचे शिक्षण

सरोजिनी वैद्य

**प्रास्ताविक**

हिंदु पंच (१८७१-१९०९) या ठाणे येथून प्रसिद्ध होणाऱ्या विनोदात्म साप्ताहिकाचा एक हेतू लोकशिक्षणाचाही होता. ब्रिटिश राजवटीतील राजकीय - सामाजिक - आर्थिक जीवनस्थितीची अनेक परिमाणे एकाच वेळी मनात ठेवून छोटे - छोटे विनोदप्रधान असे लेख पंचला प्रसिद्ध करावयाचे होते. हिंदु पंचच्या चालक - मालकां’ च्या शब्दांत सांगायचे, तर पंचसरकार/पंचआजोबा ‘ऑर्थोडॉक्स’ नव्हते आणि ‘रिफॉर्मरही’ नव्हते. त्या दोन गटांमध्ये विभागलेल्या अनेक समकालीन, विद्वान आणि गंभीर वृत्तीच्या संपादकांपेक्षा शाश्वत नीतिदृष्टीशी नाते राखून ठेवलेली अधिक मोकळी, खुली आणि हलकीफुलकी जीवनदृष्टी त्यांना प्रिय होती ‘दंभाचा स्फोट,’ गोपनाचा प्रकाश, पापाचरणाचा निषेध, सत्कृत्याचा गौरव, सुधारणेचे अभिनंदन, नीतिवानाचे स्तवन, प्रिय भगिनी व्हिक्टोरिया ऽक्काचे संबधाने ओतप्रोत राजनिष्ठा, आणि खिन्न, उदास, चिंतामग्न व आपद्‌ग्रस्त अशांना क्षणिक तरी विश्रांती देणे ही खुद्दांच्या नित्य कर्तव्यातली मुख्य कार्ये होती.

(१३ जाने. १८९८)

- ही विविध बरी-वाईट कामे (अधूनमधून पाय घसरला, तरी) लेखनप्रकारांच्या आणि लेखनशैलींच्या विविधतापूर्ण आविष्कारांतून साधताना पंचआजोबांनी घातलेल्या ‘धुमाकुळा’चे काही नमुने पुढे दिलेले आहेत.

वडलांना नोटीस

तीर्थरूप रा. नानासाहेब वडिलांचे सेवेशी -

खाली सही करणार यांजकडून नोटीस देण्यात येते, की मी आपला मुलगा असून, माझे वय नुकतेच सुमारे १३ महिन्यांचे झाले आहे. तो इतक्यात माझे आईस

पाचवा सरून सहावा महिना लागला. माझे भक्ष्य जे माझ्या मातु:स्तनातील दूध ते आता दिवसेंदिवस - कमी कमी होत जाऊन त्याची खारट रुची होत चालली असल्यामुळे मला बरेसे मानवत नसून, माझी आतापासूनच उपासमार होऊ लागली आहे. मी या वयात म्हटले म्हणजे माझ्या आईच्या अंगावर अंगाखांद्यांवर खेळावयास परंतु आईच्या शीघ्र गरोदरपणामुळे मी त्या सर्व सुखांस मुकलो असून, पुढे माझी कशी काय स्थिती होईल, सांगवत नाही. तेव्हा या सर्व दु:खाचा दोष आपल्यावर येत असून आपल्या अधीरपणामुळे मजवर हा अनर्थ प्रसंग प्राप्त झाला आहे. मला जन्मून तीन महिनेही झाले नाहीत, तोच आपण माझ्या आईसह एकशय्येस अनुकरला व त्यामुळे हा दुष्ट प्रसंग मज बालकावर आला आहे, तर ही सर्व नुकसानी आपण साडेअडीच दिवसांत नोटिशीचे खर्चासह भरून द्यावी. तसे न होईल, तर नाईलाजाने मेहरबान राजाधिराज पंचसरकारच्या कोर्टात सन २२५० च्या २२॥ व्या ॲक्टान्वये नुकसान भरून घेण्यासाठी दिवाणीत फिर्याद करणे भाग पडेल. कळावे. ता. अंगी, माहे, अंगडे, सन टोपडे.

२० जाने. १०८१ - गंगाराम नारायण करिता

एम्. व्ही. पार्कर. अरणे व सॉलीसिटर

अण्णासाहेब किर्लोस्करांची कंपनी ऐन बहरात होती, तेव्हा पंचआजोबांनीही एक आगळा व्यापार सुरू केला. त्यांनी गहाणाचे व्यवहार करणाऱ्या आपल्या कंपनीची एक जाहिरात पुढे दिल्याप्रमाणे दिली आहे :

**घमंडानंदन गहाण डुबव्ये आणि कंपनी लिमिटेड**

'या लेखाने पुणे व पुण्याचे आसपास राहणाऱ्या एकंदर शोकी व रसिक लोकांस कळविण्यात येते की, हल्ली पुण्यास किर्लोस्कर नाटक मंडळी येऊन दाखल झाली असून तिचे अडीच खेळ हप्त्याहप्त्यांनी सुरू झाले आहेत. संगीत नाटके पाहण्याचा शोक अलीकडे आबालवृद्ध स्त्रीपुरुषांमध्ये उत्पन्न झाल्याचे समजण्यात आले आहे. तथापि वेळ आहे, वखत आहे, खेळाचे दिवशी शोकी मनुष्याजवळ पैसे असतील, नसतील, याचा नियम नाही. मुले, बायका, निरुद्योगी, उत्पन्नभक्षी, इत्यादी लोकांजवळ वेळेवर





अनुक्रमणिका

पैसे असण्याचा संभव कमी. अशा लोकांचे सोयीसाठी आम्ही खाली सह्या करण्याऱ्यांनी एक भांडवलवाल्यांची कंपनी नुकतीच रजिस्टर केली आहे. ह्या कंपनीकडून सर्व प्रकारच्या बारीकसारीक व किरकोळ जिनसा व पदार्थ, त्यांच्या मूळ किमतीच्या अष्टमांशाइतके पैसे देऊन, दर सेकंद दर रुपयास एक पै व्याजाच्या दराने, वाटेल तितका पैसा गहाण मालाचे सरशीनिरशीवर विशेष लक्ष ठेवून, कर्जाऊ देण्यात येईल. मुलाकडून येणारी शालोपयोगी पुस्तके, स्त्रिया व मुलींकडून येणाऱ्या कुडुक बाळ्या, नथा. व मंगळसुत्रे वगैरे सुद्धा किरकोळ सोन्यामोत्यांच्या व चांदीच्या वस्ता व दागिने, गरीब व निरुद्योगी आणि उत्पन्नभक्षी लोकांकडून मिळणारी पागोटी, धोतरे, जोडे, बूट, सोवळी, भांडी, अंगरखे, कांबळी, जोड पासोड्या, रकटी, हंतऱ्या, चटया, उखळे, मुसळे, वगैरे यद्ययावत् लहानमोठ्या व अल्पस्वल्प किमतीच्या वस्तू आमचे दुकानी व पेढीवर लिहिलेल्या ठरावाप्रमाणे गहाणाचे पैसे घेऊन गहाण ठेवाव्या व दस्तऐवज लिहून द्यावे. सर्वांचे सोईकरता आम्ही ही पेढी मुद्दाम काढिली आहे. इ. चा उपयोग सर्व नाटकाचे शोकी व रसिक लोक करून घेतील, अशी आम्हांस पूर्ण आशा आहे. अशा प्रकारची सोय आजपर्यंत कोणाकडूनही काढण्यात व योजण्यात आली नव्हती. ही आमची स्वतःची कल्पना असून इचा उपयोग फार लोकांस व सर्व वर्गाचे स्त्रीपुरुषांस व्हावा अशी आमची इच्छा आहे. या इच्छेप्रमाणे किती लोक आमच्या या नवीन योजनेपासून फायदा करून घेतात, इकडे आम्ही लक्ष देऊन आहोत. लोकांकडून आश्रय मिळेल, त्याप्रमाणे या योजनेचा विस्तार सर्वत्र करण्याचा विचार आहे. त्याप्रमाणे या आमच्या नवीन कल्पनेबद्दल आम्ही सरकारातून पेटंट घेणार आहोत. संगीत मंडळीचे गमन बहुतकरून सर्वत्र आहे व सर्व ठिकाणी शोकी व रसिक लोकांना पैशांची जरूर लागायचीच आहे. तेव्हा, आमच्या या कंपनीपासून फार फार उपयोग होईल, अशी आमची खात्री आहे. दिवसेंदिवस लोकांच्या गरजा फार वाढत चालल्या असून लोकांमधला विश्वास व भरवसा प्रतिक्षणी कमी कमी होत चालला आहे. ह्या सर्व गोष्टींवर लक्ष दिले असता आम्ही काढलेली कल्पना अत्युपयोगी आहे, अशी सर्वांची खात्री होईल, अशी आशा आहे.

घमंडानंदन गहाण डुबव्ये आणि कंपनी (१३ जाने., १८८१)

**राज्य मराठी विकास संस्था, ३, महापालिका मार्ग, मुंबई ४०० ००१**

# लहान मुलांसाठी हसत-खेळत शिक्षण

**वंदना कुलकर्णी**

पुण्यातल्या कर्वे रस्त्यावरच्या श्री. ना. दा. ठा. महाविद्यालयामध्ये संध्याकाळी चक्कर टाकली, तर हा परिसर मुलांनी फुलून गेलेला दिसतो. कुणी मैदानावर डॉज बॉल खेळताना, तर कोणी बागेत जंगलजिमवर किंवा घसरगुंडीवर किंवा टायर पळवताना, तर कुणी गच्चीत नाटक करत असताना किंवा काही जण वर्गात ओरिगामी करताना . . . हे आहे बालरंजन केंद्र - नाव आनंदरंग.

एस्. एन्. डी. टी कॉलेजच्या होमसायन्स विभागातर्फे तीन वर्षांपूर्वी 'कम्यूनिकेशन मीडिया फॉर चिल्ड्रेन' हा एक वर्षाचा पदव्युत्तर अभ्यासक्रम सुरू करण्यात आला.

'मुलांचा विचार करून प्रौढांसाठी असलेला' हा भारतातील एकमेव अभ्यासक्रम आहे. म्हणूनच या ठिकाणी 'आनंदरंग' ची मुलांसाठी काम करणारी संस्था एवढीच माहिती न देता या संपूर्ण अभ्यासक्रमाची थोडक्यात माहिती देणंही आवश्यक आहे. कारण आज बालमानसशास्त्र, बालव्यक्तिमत्त्व-विकास या कल्पनांनी वेग घेतलाय्. स्वयंसेवी भावनेनं, मुलांविषयी वाटणाऱ्या प्रेमानं वैयक्तिकरीत्या किंवा गटागटानं काम चाललेलं दिसतं. त्यांच्या हौसेला, आवडीला या प्रशिक्षणातून एक निश्चित दिशा मिळेल, भूमिका मिळेल, असं वाटतं.

आजच्या मुलांवर संपर्क-माध्यमांचा (मास मीडियाचा) पडणारा प्रभाव अपरिहार्य आहे. मुलांच्या बोलण्यातून, वागण्यातून, हालचालींतून दूरदर्शनचा प्रभाव जाणवत असतोच. पण याशिवाय आकाशवाणी, फिल्मस्, जाहिराती, वर्तमानपत्रं, पुस्तकं, मासिकं, पोस्टर्स यांचाही त्यांच्यावर कळत-नकळत निश्चितच परिणाम होत असतो. पण या संपर्क माध्यमांचा योग्य, चांगला उपयोग होत असल्याचं फारसं आढळत नाही. मोठ्यांच्या आवडी-निवडी, विचार, मतांनुसार चालणाऱ्या मोठ्यांच्या विश्वात मुलांना स्वतःची अशी जागा नाही. इतकंच काय, पण मुलांच्या आवडीनिवडीचे ठोकताळेही प्रौढांनीच निश्चित केलेले असतात. ज्यांना आपण उद्याचे आधारस्तंभ वगैरे म्हणतो, ती मुलं अशा रीतीनं खूप उपेक्षित आहेत, हे कटू सत्य आहे. हे सारं लक्षात घेऊन या विविध माध्यमांच्या जगात वावरणाऱ्या, वाढणाऱ्या मुलांना या विविध माध्यमांतून चांगले कार्यक्रम कसे देता येतील, याचा 'विचार' देणारा हा अभ्यासक्रम





अनुक्रमणिका

आहे. यामध्ये चार विषयांचे लेखी पेपर्स (थिअरीचे) आहेत -

(१) चाइल्ड डेव्हलपमेंट (बालविकास शास्त्र)

(२) मीडिया एन्व्हायरॉनमेंट ॲंड कल्चरल एज्युकेशन. (मुलांचा सांस्कृतिक परिसर)

(३) कम्युनिकेशन मीडिया (संपर्क माध्यमे)

(४) सोशल सायकॉलॉजी ऑफ रिक्रीएशन. (मनोरंजनाचे सामाजिक मानसशास्त्र)

या कोर्सचा खरा गाभा, आत्मा आहे, तो म्हणजे गेस्ट लेक्चर्स व प्रशिक्षण शिबिरं. यांमध्ये विविध क्षेत्रांतील तज्ज्ञ लोकांचं मार्गदर्शन, प्रत्यक्ष अनुभव ऐकायला मिळतात. बालसाहित्य म्हणजे काय, ते लिहिताना कोणती पथ्यं पाळावीत. हे प्रात्यक्षिकांसह अनेक वर्षं मुलांसाठी लेखन करणाऱ्या लीलावती भागवतांसारख्या बालसाहित्यिक, मुलांसाठी कथाकथन कसं करावं, त्यासाठी गोष्टी कशा निवडाव्यात, कशा लिहाव्यात याविषयी माधव वझे, चित्रकलेविषयी चित्रकार भैयासाहेब ओंकार, माधुरी पुरंदऱ्यांसारखे, तर बालरंगभूमीविषयी गेली अनेक वर्षं 'शिशुरंजन' ही मुलांची नाट्यसंस्था चालवणारे श्रीधर राजगुरू अशा अनेक नामवंत, जाणकारांकडून अनुभव, माहिती मिळते. याशिवाय पंधरा दिवसांचं नाट्य प्रशिक्षण शिबिर. नाटकात काम करताना आवाजाचा, शरीराचा कसा उपयोग करता येतो या नाट्यात्मक गुणांबरोबरच या शिबिराचा उपयोग होतो, तो मोकळं होण्यासाठी, एरवी वाटणारी अवास्तव लाज जाऊन, मुलांमध्ये मिसळताना लागणारी एक मोकळीक निश्चितच येते. फिल्म ॲप्रिसिएशनचंही असंच आठ-दहा दिवसांचं शिबिर होतं. यात देशीविदेशी अनेक प्रकारच्या सुंदर फिल्मस् पाहायला मिळतात. त्या बघण्याची दृष्टी, निर्मितीमागचं तांत्रिक ज्ञान व सिनेमा, दूरदर्शनच्या 'भाषेची जाण' निर्माण होते, फिल्म इन्स्टिट्यूटच्या जाणकारांबरोबर झालेल्या या फिल्मस्‌विषयीच्या चर्चेतून.

पपेट्स हा आताशा दुर्मीळ होत चाललेला प्रकार आहे. पण या पपेट्स (बोलक्या बाहुल्या) कशा बनवायच्या, कशा वापरायच्या, याचं तंत्र, त्यांचे विविध प्रकार यांचाही प्रत्यक्ष कार्यानुभव मिळतो, हे सारं करत असताना निर्मितीचा अगदी खराखरा आनंद मिळत असतो. पपेट्स बनवून, त्यांच्यासाठी स्क्रिप्टस् लिहून, मुलांसमोर सादर करायच्या. त्याला ताबडतोब मिळणारा मुलांचा प्रतिसाद, तो किती तऱ्हांनी मिळू शकतो, यावर विचार करणं या साऱ्यांतून विद्यार्थिनींचा स्वतःचाही खऱ्या अर्थानं

विकास होत असतो.

मुख्य म्हणजे, केवळ पाश्चात्त्य पुस्तकी ज्ञानावर या अभ्यासक्रमाचा डोलारा उभा नसून, तो इथल्या मातीशी नातं सांगणारा आहे. पुस्तकी ज्ञान आणि प्रत्यक्ष अनुभव, जीवन व शिक्षण या दोहोंची परस्परांशी सांगड घालणारा हा कोर्स आहे. मुलांसाठी काही करायचं असेल, मग ते साहित्यात असो, नाटकात असो, की कोणत्याही क्षेत्रात असो. मुलांमध्ये मिसळणं, त्यांचं भावविश्व जाणून घेणं आवश्यक असतं -- आणि इथं त्यासाठीच आहे 'आनंदरंग'. ३ ते १२ वर्षांच्या मुलांसाठी चालवलं जाणारं 'बालरंजन केंद्र'! वर्षभरातल्या कार्यानुभवाचं, चाइल्ड डेव्हलपमेंट मध्ये शिकलेल्या गोष्टींचा प्रत्यक्ष अनुभव देणारं, पडताळून पाहायला मदत करणारं!

आनंदरंगमध्ये येणाऱ्या मुलांचे ३ ते ५, ६ ते ८ नि ९ ते १२ असे वयानुसार तीन गट करतात. त्यांच्या गटाला हवं असणारं नावही मुलांच्या आवडीनुसार दिलं जातं. मुलांची वयोमानानुसार येणारी जाण, आवड अगदी यातही दिसून येते. छोट्या गटाचं नाव मुलं 'गुलाब', 'कमळ' असंच एखादं ठेवतात, तर मोठी मुलं अगदी 'स्टार' वगैरे.

या मुलांसाठी रोज काय नि किती वेळ घ्यायचं, याचं आठवडाभराचं वेळापत्रक आधी तयार केलं जातं. अर्थात मुलांच्या आवडीनिवडी, मुलांचे त्या वेळचे मूडस् हे सारं लक्षात घेऊन त्यात बदलही होतातच. पण शारीरिक मेहनतीच्या खेळांबरोबर, इतरही अनेक नव्या गोष्टी मग ते एखादं गाणं असेल, ओरिगामीचा प्रकार असेल, त्या त्यांना यायला हव्यात, यासाठी पुरेसा वेळ देता यावा, याचा विचार करूनच ते वेळापत्रक आखलेलं असतं. ११ - १२ वर्षांच्या मुलांना जास्त नैपुण्य लागणारे, शारीरिक खेळ - उदा. , डॉज बॉल, लंगडी जास्त आवडतात. या वयात खेळापेक्षाही स्पर्धात्मकतेकडं त्यांचा जास्त कल असतो. म्हणूनच त्यांच्या आवडीकडं लक्ष देताना कुठं याला तर खतपाणी घातलं जात नाही ना, हे देखील पाहावं लागतं.

रोज मैदानी खेळांबरोबरच मुलं कधी भेटकार्डं बनवतात, तर कधी चित्रं काढतात, कधी रंगीत खडूंनी, तर कधी पोस्टर कलर्सनी, कधी प्रत्येकजण स्वतंत्र चित्र काढतो, तर कधी चार-पाच जण मिळून एखादा विषय घेऊन चित्र पूर्ण करतात. कोलाज करायचं, तेही असंच -- स्वतःच बनवलेल्या वेगवेगळ्या प्रकारच्या माशांना चिकटवून ॲक्वेरियम करायचं, रंगवायचं, मातीच्या वस्तू बनवायच्या, कुंड्या रंगवायच्या, झाडं लावायची, झाडं वाढवायची, टेबलाभोवती जमून तोंडांनी नि

हातांनी प्रत्येकानं वेगळा आवाज काढून ऑर्केस्ट्रा करायचा, तर कधी विषय घेऊन प्रसंगनाट्यं करायची, कधी टेकडीवर फिरायला जायचं, जाताना वाटेतल्या झाडांची नावं, माहिती करून घ्यायची. सर्वांत छोट्या गटाला तर बाग म्हणजे पर्वणीच असते. सुरुवातीला साऱ्यांनी मिळून 'या, रे, या, सारे या, मिळून गंमत करू,' हे गाणं म्हटलं, की कधी एकदा जंगल जिमवर चढतोय्, असं होऊन जातं. मग तिथंच चढत, उतरत, कसरती करत राहायचं खूप वेळ, तर काही जण वाळूत डोंगर, डोंगराकडं जाणारा पूल, डोंगरावर गवताचं वृक्षारोपण करण्यात मग्न, तर काही जण टायर पळवण्यात रमलेले. अभिनयगीतंही खूप आवडीनं म्हणतात ही पोरं. 'जंगल झाडीत वाघोबा लपले, म्हातारीला पाहून खुदकन हसले, म्हणत असताना 'वाघोबाने भोपळा अडविला' असं करताना आवेश अगदी पाहण्यासारखा असतो. तर एखादी रूपाली खंजिरी घेऊन बसते सारा वेळ. मुलांच्या या कार्यक्रमाचं नियोजन करताना त्यांच्या वैयक्तिक तशाच सामूहिक गरजा नि आवडी पूर्ण होताहेत ना, याकडंही लक्ष द्यावं लागतं, त्यांच्या वयाबरोबरच त्याची शारीरिक, मानसिक वाढही लक्षात घेतलीय्. म्हणूनच सात वर्षांच्या आशुतोषला जेव्हा दादाच्या गटात खेळावंसं वाटतं, तेव्हा तो त्यांच्यांत खेळतो. मुलांना नव्या संकल्पना सहज-सोप्या रीतीनं समजावून देण्यासाठीही खेळांचा खूप छान उपयोग होतो. शिवाय त्यांची भाषा समृद्ध करण्यासाठी, वाढवण्यासाठी देखील. याशिवाय मुलांसाठी कधी पपेट शो, तर कधी फिल्मस्, कधी कथाकथन, तर कधी सहली. यांशिवाय मुलांचा कार्यक्रम -- विविधगुणदर्शनाचा. ज्याला इच्छा असेल, तो प्रत्येक जण स्टेजवर येऊन काहींना काही सादर करतो.

आनंदरंगमध्ये वर्षाच्या सुरुवातीला खूप रडणारा दिलीप, बरेच दिवस न बोलता, न खेळता नुसतीच बसून राहणारी सोनल हळूहळू छान रुळून जातात. नेहमी दुसऱ्यांच्या खोड्या काढणारा, त्रास देणारा -- उगाचच खडा टाकून मार, सायकलमधली हवाच सोड, असं करणाऱ्या सुनीलला समजावून घेताना कळतं त्याच्या घरची अतिरेकी शिस्त, नि प्रेम-आपुलकीची वानवा. संतोष - शिल्पाही असेच कुढलेले. कारण त्यांची आई त्यांना सतत सांगत असते : अमुकच कर, ते करूच नकोस, त्याला हात नाही लावायचा. यात त्यांना काय वाटतं, आवडतं, करावंसं वाटतं, याचा विचारच नसतो. कुठंही मोठ्यांच्या अशा वागण्याचा मुलांच्या मनावर, वर्तनावर कसा, काय परिणाम होत असतो, हे मुलांच्याच वागण्यावरून आपल्याला कळत जातं. वर्षभर मुलांमध्ये राहून मुलांचा भावनिक, सामाजिक विकास अक्षरशः जाणवतो. अंगण

हरवलेल्या, फ्लॅट संस्कृतीत बोलायला, खेळायला, व्यक्त करायला सवंगडी नसणाऱ्या मुलांसाठी अशी बालरंजन केंद्रं 'मित्र' ठरतात. त्याच्या चौकस, सर्जनशील, संवेदनक्षम 'माणूस' बनण्यासाठीच्या कामात याचाही खूप महत्त्वाचा सहभाग आहे.

**आनंदरंग, श्री. ना. दा. ठा. गृहशास्त्र महाविद्यालय, कर्वे रस्ता, पुणे ४११००४**

## ज्ञानाचा उतारा

६ सप्टेंबर, १९३७. महापंडित भिक्षु राहुल सांकृत्यायन यांचे अलाहाबाद विद्यापीठाच्या विद्यार्थ्यांसमोर भाषण. निमित्त : राहुलजी रशियाला दुसऱ्यांदा जाण्याच्या तयारीत. अध्यक्ष होते पंडित जवाहरलाल नेहरू.

राहुलजींनी आपल्या भाषणात सगळं ज्ञान जुन्या पोथ्यांमधूनच आहे, असं मानणाऱ्या मंडळींच्यावर कडक टीका केली. ते म्हणाले :

बहुतेक जुन्या पोथ्यांमधून पंचाहत्तर टक्के तर मूर्खपणाच भरलेला असतो. अधूनमधून काही शहाणपण असेल, तेवढंच.

आपल्या अध्यक्षीय समारोपात नेहरूंनी दोन मुद्दे मांडले. पहिला राहुजलींसारखे विचारवंत आपल्या विश्वविद्यालयांमधून का उत्पन्न होत नाहीत? दुसरा : राहुलजींनी मांडलेला मुद्दा माझ्यासारख्याने मांडला असता, तर लोक म्हणाले असते : तुला, रे, काय जुन्या पोथ्यांची माहिती? पण आज तो मांडणारी व्यक्ती तर जुन्या ग्रंथांमध्ये जणू पोहत राहणारी व्यक्ती.

राहुजलींच्या भाषणामुळे अस्वस्थ झालेले काही विद्यार्थी या अध्यक्षीय भाषणामुळे तर रागावलेच. त्यांतला एक उठून म्हणाला : पोहत राहणारे तर खरेच, पैलतीर तर कधी गाठलाच नाही.

हजरजबाबी नेहरू लगेच म्हणाले :

खरं आहे, कूपात पोहणाऱ्या बेडकांना पैलतीर गाठणे सहज शक्य असते. पण ज्ञानाच्या अथांग सागरात पोहणारे पैलतीराला पोचत नाहीत, पोहतच राहतात.

राहुलजींची स्थिती तर त्यांना 'अविषय' नाहीच, अशी होती.

गुणाकर मुळे, **महापंडित राहुल सांकृत्यायन : जीवन और कृतित्व** (नयी दिल्ली : नॅशनल बुक ट्रस्ट, १९९३) वरून संक्षेपाने (पृष्ठ १ - २)

# ग्राम्यतेतील सामर्थ्य

**श्रीपाद जोशी**

फार वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. नेहमीप्रमाणे सकाळचे फिरणे आटोपून मी घरी परत येत होतो. इतक्यात रस्ता झाडणाऱ्या दोन म्हारणींच्या (१) भांडणाने माझे लक्ष वेधून घेतले. त्यांच्यापैकी एकजण दुसरीला म्हणत होती.

"हे बरं हाय की! झाडानं झवायचं आन् खोडाकडं पैसं मागायचं!"

त्या बाईने वापरलेली म्हण मी पूर्वी कधी ऐकली नव्हती. त्यामुळे मला ती ऐकून गंमत वाटली. अर्थात ती कितीही प्रभावकारी किंवा परिणामकारक असली, तरी ती वापरण्याची हिंमत माझ्यात नव्हती. तिच्या ऐवजी 'करायचं एकानं आणि भरायचं दुसऱ्यानं, हा चांगला न्याय आहे की!' एवढा वाक्यसंभार वापरणे मला भाग होते. परंतु परिणामकारकतेच्या दृष्टीने तो अगदीच मिळमिळीत होता, यात शंका नाही. आमच्या कोल्हापूरच्या मटणाचा भुरका झिणझिण्या आणतो, असे म्हणतात. असा झटका देण्याचे सामर्थ्य ग्राम्य शब्दांमध्ये असल्याचे अनेकदा अनुभवास येते. माझे बाळपण कोल्हापूर संस्थानातल्या खेड्यात गेल्यामुळे ग्राम्यतेच्या सामर्थ्याची मला पूर्ण कल्पना होती. ती सारी भाषा माझ्या तोंडात बसलेली होती. परंतु कालांतराने वर्धा -- सेवाग्रामच्या आश्रमी सभ्यतेच्या वातावरणात राहिल्याने ती भाषा आपोआपच तोंडातून पुसली गेली. या सभ्यतेचा किती अतिरेक झाला होता, याचा एक अनुभव नमूद करण्यासारखा आहे. आचार्य काकासाहेब कालेलकर यांच्याबरोबर त्यांचा अंतेवासी म्हणून राहत असताना मी अधूनमधून माझे लिखाण त्यांना वाचून दाखवीत असे. अशाच एका कथेत 'शिंचा' हा शब्द मी वापरला होता. माझ्या दृष्टीने तो शब्द अगदीच मवाळ, सभ्य होता. कारण सुसभ्य (अर्थात ब्राह्मण) लोक नेहमीच्या

---

(१) ज्या काळातली ही घटना आहे, त्या काळी 'महार', 'महारीण' वगैरे शब्द आक्षेपार्ह व बेकायदेशीर समजले जात नव्हते. आता त्या जातिवाचक शब्दांऐवजी 'सफाई कामगार', 'झाडूवाली' वगैरे शब्द वापरणे उचित समजले जाते.

संभाषणात तो सर्रास वापरीत असत. परंतु तो शब्द ऐकताच काकासाहेब एकदम दचकले आणि म्हणाले,

"छिः! छिः! असला घाणेरडा शब्द तुमच्या लेखणीतून बाहेर तरी कसा पडला?"

मला काहीच समजेना. तेव्हा त्यांनी मला त्या शब्दाची व्युत्पत्ती सांगितली. 'शिंदळीचा' या शब्दाचे ते संक्षिप्त रूप असून 'शिंदळ' किंवा 'शिनळ' म्हणजे छिनाल, व्यभिचारी स्त्रीचा मुलगा, असा त्याचा अर्थ होतो. 'महाराष्ट्र शब्दकोश'-कारांनी 'यातील वाईट अर्थ निघून गेला आहे' अशी हमी दिली असली, तरी काकासाहेबांसारख्या गांधीवादी साहित्यिकाला तो आक्षेपार्ह वाटत होता. त्यामुळे मग मीही त्या शब्दावर बहिष्कार घातला.

तसे पाहिल्यास 'गांडू', 'साला', 'शिंचा' हे मुळात ग्राम्य शब्द असले, तरी कालांतराने त्यांच्यांतील ग्राम्यता पुसट होत गेली आणि ते काही अंशी निरर्थक बनले; आणि नापसंतीदर्शक उद्‌गारवाचक अव्यय म्हणून त्यांचा वापर होऊ लागला. त्यामुळे त्यांना अपशब्द समजण्यात काही अर्थ उरला नाही.

असाच नेहमीच्या वापरातला ब्राह्मणी अपशब्द 'भोसडीचा' आमच्या गावातले पुरुष वापरीत असत. वस्तुतः 'भोसडी' म्हणजे स्त्रियांचे जननेंद्रिय. कोशकारांनी हा शब्द अश्लील ठरविला आहे. परंतु त्याचा हा मूळ अर्थ माहीत नसल्यामुळे प्रतिष्ठित ब्राह्मण स्त्रीपुरुष त्याचा सर्रास वापर करीत. आजही तो ग्रामीण भागात फारसा असभ्य समजला जात नाही. त्यामुळे मुलांबाळांसमोर त्याचा वापर करताना कोणाला संकोच वाटत नाही. एका दृष्टीने तो निरर्थकच बनला आहे.

ब्राह्मण पुरुषांच्या तोंडी जे अपशब्द असत, त्यांहून थोडे वेगळ्या प्रकारचे अपशब्द अब्राह्मण पुरुषांच्या तोंडी असत. 'भाड्या', 'भडवा', 'बाराबोड्याचा' (जारज) यांसारखे ते शब्द असत.

पुण्यात आल्यावर 'भाडखाऊ' (घरच्या स्त्रियांच्या वेश्यावृत्तीवर निर्वाह करणारा) हा 'भाड्या' किंवा 'भडवा' (वेश्यांचा दलाल) याच अर्थाचा शब्द ऐकण्यात आला. तो आमच्या बाजूला प्रचारात नव्हता.

अब्राह्मण पुरुषांच्या तोंडी 'सुक्काळीचा' ही एक नेहमीची शिवी असे. त्या

शब्दाचा अर्थ किती भयंकर आहे. हे कालांतराने शब्दकोश पाहिल्यावर समजले.[२]

अपशब्दांच्या वापराच्या बाबतीत ग्रामीण स्त्री ग्रामीण पुरुषांहून काकणभरही कमी नव्हती – मग ती कोणत्याही जातीची असो! अर्थात जात्यनुसार त्यांच्या शिव्यांमध्ये फरक असे. ब्राह्मण बायकांच्या तोंडी 'मेला', 'काळतोंड्या', 'रांडिच्या' (रांडेचा) हे अपशब्द असत; तर कुणबी बायकांच्या तोंडी बहुतेक सगळ्या पुरुषी शिव्या असत. (आमच्या भागात अब्राह्मण स्त्रिया मी जातो, करतो, खातो अशी पुल्लिंगी क्रियापदे वापरीत!). त्याखेरीज त्यांच्या अशा काही खास शिव्याही असत. 'अरं माज्या वाद्या', 'अरं माज्या सुडक्या' अशा प्रकारच्या शिव्या असत. त्यांमध्ये रागाबरोबरच थोडेफार कौतुकही असे. म्हणजे लटक्या रागाची अभिव्यक्ती करणारी ती संबोधने असत. त्यांपैकी 'वाद्या' हा शब्द 'वादी' म्हणजे फिर्यादी, शत्रू या शब्दापासून बनलेला, 'दुसमान' (दुश्मन) यासारखा आहे. परंतु 'सुडका' हा शब्द कळत नसे. कालांतराने शब्दकोशातील त्याचा अर्थ (जुने फडके; पटकूर; म्हातारा माणूस; फक्त लंगोटी जवळ असलेला माणूस) वाचण्यात आल्यावर थोडा-फार अर्थबोध झाला. परंतु जेव्हा अर्थ कळत नव्हता, तेव्हाही ती प्रेमाने दिलेली काहीतरी शिवी असली पाहिजे, एवढे कळत असे. एक गमतीची गोष्ट अशी, की प्रेम, लडिवाळपणा, जवळीक व्यक्त करण्यासाठी पुष्कळदा अपशब्दांचा वापर केला जाई. माझ्या बहिणी किंवा भाच्या लहान असताना माझे आजोबा त्यांना मांडीवर घेऊन खेळवताना 'माझं रांडरू ते!' 'माझी रांड ती गुणाची!' असे म्हणत. ते ऐकण्याची कानांना इतकी सवय झाली होती, की आम्हांला त्या अपशब्दांचे काहीच वाटत नसे.

### तोंडातील अपशब्द

कुरवाडी (कुणबी) बायकांच्या 'रांड', 'रंडकी', 'बाजारबसवी', 'गावभवानी', 'बया' वगैरे शिव्यांचा अर्थ सहज समजे. परंतु 'व्हयमाली' या शिवीचा

---

(२) सुकाळया - वि. अत्यंत विषयासक्त; कामोत्सक (पुरुष, स्त्री) (२) सुखार्थ वारंवार दुसऱ्या पुरुषापासून मैथुन करून घेत असावे, अशा स्वभावाचा (पुरुष स्त्री, नपुंसक) 'याचा अर्थ असा, की आजकाल पाश्चात्त्य देशात बोकाळलेली समलिंगी संभोगाची प्रथा आपल्याकडे फार पूर्वीपासून चालू होती! मात्र कोशकारांनी हा शब्द 'सुकाळ' या सुंदर शब्दाच्या पोटात का घातला असावा ते कळत नाही.

अर्थ नंतरही कळला नाही. एक स्त्री दुसऱ्या स्त्रीला रागाच्या भरात 'तुजा दाणा फाडतो' अशी शिवी देई, तेव्हा अंदाजाने 'दाणा' हा स्त्रीच्या जननेंद्रियाचा एखादा भाग असल्याचे लक्षात येई. मराठी कोशकारांनी पुरवणी विभागात (पृ. १२३) '(ग्राम्य) मदनछत्र असा अर्थ दिला आहे. परंतु, खुद्द त्यांच्या कोशात किंवा हिंदी, गुजराती, बंगाली व संस्कृत (आपटे) कोशात हा 'मदनछत्र' शब्द कोठेच आढळलेला नाही.

**ग्राम्यता व अश्लीलता यांतील फरक**

सहज लक्षात येण्यासारखी गोष्ट म्हणजे, हे सारे अपशब्द बहुशः शरीराच्या मध्यप्रदेशाशी (जननेंद्रिये व गुदद्वार यांच्याशी) संबंधित आहेत. शरीर व मन अत्यंत आवश्यक असणाऱ्या परंतु गलिच्छ समजल्या जाणाऱ्या क्रियांशी अपशब्दांची गाठ घालण्यात आली आहे.

या संदर्भात एक जुना प्रसंग आठवतो. १९६४ साली मंटोच्या 'अल्लादिता' या कथेच्या अनुवादाबद्दल माझ्यावर अश्लीलतेचा खटला भरण्यात आला होता. त्या वेळी पोलिस खात्याचा एक विनोद समजला. अश्लीलतेच्या गुन्ह्याचा तपास करण्याचे काम शहरातल्या वेश्यावस्तीवर लक्ष ठेवणाऱ्या विभागाकडे होते. त्या विभागाची प्रमुख एक बाई होती. त्यामुळे आपल्या समोर आलेला लेखक हा कुणी प्रतिष्ठित नागरिक नसून बेकायदा धंदा करणारा कोणी भडवाच आहे, या दृष्टीने ती माझ्याकडे पाहत आहे, असा मला भास होई.

सारांश, ग्राम्यता व अश्लीलता, असभ्यता व असंस्कृतता यांचा संबंधही याच इंद्रियांशी त्यांच्या क्रियाकलापांशी जोडण्यात आलेला आहे. त्यामुळे ग्राम्य, अश्लील, असभ्य, असंस्कृत शब्द व भावना यांचे निष्कारण गाठोडे बांधण्यात आले आहे. परिणामतः बहुतेकांना ग्राम्यता व अश्लीलता यांतील फरकच कळत नाही.

वस्तुतः शहरी माणसांच्या कानांना अपरिचित असणारे व म्हणून त्यांना खटकणारे परंतु ग्रामीण भागात सर्रास वापरले जाणारे अशा शब्दांना ग्राम्य म्हटले जाते. प्रत्यक्षात अभिव्यक्तीचा तो एक वेगळा प्रकार असतो, एवढेच. नागरी आचार-विचारांहून वेगळे असे आचार-विचारही ग्राम्यच समजले जातात. त्यांमध्ये तिरस्कार, निषेध करण्यासारखे काही नसते. ती एक वेगळी जीवनपद्धती आहे, हे ओळखले, की तिच्यात आक्षेपार्ह असे काही उरत नाही.

याच्या उलट, मनात विकृत कामविकार जागृत करण्याच्या हेतूने वापरले जाणारे गलिच्छ शब्द, प्रसंग, चित्रे, हावभाव वगैरेंचा समावेश अश्लीलतेमध्ये होतो. ग्राम्यता ही सुंदर असू शकते. परंतु अश्लीलता मात्र श्रीहीन, कुरूपच असते. हा फरक लक्षात ठेवल्यास ग्राम्यतेचा बाऊ करण्याचे कारण उरत नाही. ग्राम्यता आणि अश्लीलता यांचा काहीच परस्परसंबंध नाही. एकही ग्राम्य शब्द (अपशब्द) न वापरता अश्लील लिहिता व बोलता येते. किंबहुना नुसत्या हावभावांनीही अश्लीलता दर्शविता येते. असे सोज्ज्वळपणे अश्लील लिहिणारे, बोलणारे व अश्लील हावभाव करणारे तथाकथित सभ्य लोक समाजात पदोपदी आढळतात. याच्या उलट ग्राम्यता ही बहुधा अत्यंत निरागस असते. अनेकदा तिच्यातील ही निरागसता मोठी मोहक बनते आणि वापरून झिजलेल्या शब्दांच्या नकली नाण्यांऐवजी ग्राम्य शब्द हे खणखणीत अस्सल नाण्यांसारखे वाटू लागतात. मग ते अधिक परिणामकारक का ठरतात, तेही लक्षात येते.

**माणूस अपशब्द का वापरतो?**

या संदर्भात एका प्रश्नाचा विचार करणे अप्रस्तुत ठरणार नाही. तो प्रश्न असा, की माणूस अपशब्द का वापरतो? याचे सरळ व साधे उत्तर असे, की ग्राम्य शब्द किंवा अपशब्द हा मुख्यतः आपला राग व्यक्त करण्यासाठी वापरला जातो. परंतु सगळेच लोक रागाच्या अभिव्यक्तीसाठी अपशब्दांचा वापर करीत नाहीत, याचे कारण काय? याची दोन कारणे असतात. पहिले असे, की सभ्य, सुसंस्कृत माणसाला आपला राग व्यक्त करण्यासाठी अपशब्दांचा वापर करणे ही निम्न कोटीची, आपल्या प्रतिष्ठेला न शोभणारी गोष्ट आहे, असे वाटते. म्हणून तो अशा शब्दांचा वापर टाळतो. त्याऐवजी 'मूर्ख', 'महामूर्ख', 'नीच', 'निर्बुद्ध' यांसारखे क्रोध व्यक्त करणारे शब्द तो वापरतो. तो अधिक सुसंस्कृत किंवा शब्दांच्या बाबतीत सोवळा असेल, तर आपली नाराजगी शब्दांच्या द्वारे व्यक्त करण्याऐवजी चेहऱ्यावर अप्रसन्नतेचे भाव आणून किंवा मौन पाळून आपली नाखुशी व्यक्त करतो. परंतु सर्वसामान्य लोकांचा आपल्या मनावर एवढा ताबा नसतो. ते चटकन भावनेच्या आहारी जातात आणि एखादी शिवी हासडून आपला क्रोध व्यक्त करतात; व थोड्याच वेळात सारे काही विसरून जातात. अशा प्रकारे त्यांच्या मनांतली मलिनता शब्दांच्या मोरीतून वाहून जाते. एका दृष्टीने ही प्रक्रिया मन निर्मळ ठेवायला उपयुक्त ठरते. अशा लोकांच्या मनांत द्वेष, क्रोध हेवा





अनुक्रमणिका

यांची घाण साठून राहत नाही.

दुसरे कारण असे, की अपशब्दांचा वापर हे माणसाच्या दुबळेपणाचे बाह्य लक्षण आहे. जो सबळ असतो, तो राग येताच काडकन थोबाडात मारतो किंवा सरळ गोळी घालतो. त्याला क्रोधाच्या अभिव्यक्तीसाठी अपशब्दांचा वापर करण्याची गरज वाटत नाही. सामान्यतः वडील माणसे लहान मुलांच्या बाबतीत आणि ताकदवान लोक दुबळ्या लोकांच्या बाबतीत या मार्गाचा अवलंब करतात.

मला लहानपणचा एक अनुभव या संदर्भात आठवतो. आमच्या वर्गात एक मोठा आडदांड मुलगा होता. तो स्वतः कधी शिव्या देत नसे आणि इतरांनी दिलेल्या शिव्या ऐकून घेत नसे. कुणी शिवी दिली, की तो त्या शिवी देणाऱ्याला एक गुद्दा लगावीत असे; आणि म्हणत असे,

"घे! शिवीला कांदा!"

त्याने पुनः शिवी दिली, की पुनः गुद्दा मारीत असे. त्यामुळे त्याला कोणी शिवी देत नसे.

वस्तुतः अपशब्द हे दुर्बळांचे अत्यंत तीक्ष्ण व धारदार हत्यार असते. बंदुकीतून गोळी सुटावी किंवा छातीत सुरा भोसकला जावा, त्याप्रमाणे समोरच्या माणसाच्या अंतःकरणावर प्राणघातक वार किंवा आघात करून त्याला घायाळ करण्याचे शस्त्र म्हणूनच माणसाने अपशब्दाचा शोध मोठ्या परिश्रमाने लावला असावा; किंवा उत्स्फूर्तपणे तो लागला असावा!

काही असंस्कृत लोक मोठ्या प्रेमात आले असता अथवा जास्त जवळीक व अनौपचारिकता दाखवविण्यासाठी देखील अपशब्दांचा वापर करतात; परंतु त्या प्रसंगात ते अपशब्द अगदी निरर्थक असे सहजोद्गार असतात. त्यांच्याविषयी गंभीरपणे विचार करावयाचा नसतो, हे सर्वांनीच गृहीत धरलेले असते.

**अपशब्द हे गुह्येंद्रियांशीच संबंधित का असतात?**

आपले बहुतेक अपशब्द हे मुख्यतः स्त्रीपुरुषांच्या पुढील व मागील गुह्येंद्रियांशी संबंधित असल्याचे आढळून येते. त्याची कारणेही तशी स्पष्ट आहेत. पहिले कारण असे, की ही इंद्रिये शरीरातील घाण बाहेर टाकणारी असल्याने ती गलिच्छ व अपवित्र समजली जातात. त्यांना स्पर्श करावा लागल्यास आपण साबण लावून हात धुतो. यावरून आपल्या मनात त्यांच्या विषयी किती किळस असते, याची कल्पना येते.

त्यांचा उल्लेख करून आपण जणू समोरच्या व्यक्तीविषयी वाटणारी घृणा, किळस, तुच्छताच व्यक्त करतो. योनिशुचिता हे स्त्रीच्या शीलाचे पावित्र्याचे प्रतीक समजले जाते. त्याच्यावरच शाब्दिक हल्ला चढविल्यास समोरच्या व्यक्तीचे अंतःकरण छिन्नभिन्न होऊन जाते. त्यात पुनः माता हा प्रत्येक व्यक्तीचा मानबिंदू असल्यामुळे त्यावर आघात करण्यावर माणसाचा भर असतो. या बाबतीत माणसे कधी-कधी अडाणीपणाचे प्रदर्शनही करतात. पुराणात उर्दू कवी जोश मलिहाबादी एक किस्सा सांगत असत. ते म्हणत,

"आजकालच्या पोरांना शिवी कशी द्यावी, तेही कळत नाही. एका अडाण्यानं मला आईवरून शिवी दिली. ती ऐकून मला त्याचा राग येण्याऐवजी त्याची कीवच आली. मी त्याला म्हणतो, 'बेटा, माझ्या नाती तुझ्या वयाच्या आहेत. माझी आई कधीच मरून गेलीय्. माझी बायको म्हातारी झालीय् आणि मुलगी तुझ्या आईच्या वयाची आहे. अशा स्थितीत मला आईवरून शिवी देण्यात काय अर्थ?'

जोशसाहेबांप्रमाणे भाषेचा योग्य वापर आणि औचित्य यांचा विचार आपण केला, तर असे आढळून येते, की अपशब्दांचा वापर सामान्यतः अत्यंत अविवेकाने व अंदाधुंदपणे केला जातो. तसे होणे स्वाभाविकही असते. कारण माणूस रागाच्या आहारी गेला, की त्याचा विवेक नष्टच होतो आणि त्याच्या हातून घडू नयेत, त्या गोष्टी घडतात. त्यांतलीच एक गोष्ट अपशब्दांचा वापर ही असते. याच्या उलट, माणूस सुसभ्य, सुसंस्कृत, विवेकी बनला, की त्याला अपशब्दांचा वापर करण्याची गरजच भासत नाही. अर्थात अशा व्यक्तींची संख्या समाजात नेहमीच अगदी नगण्य राहणार.

आणखी एक संभावना या बाबतीत असते. ज्यांची कामवासना अतृप्त राहिलेली असते, त्यांनी ती तृप्त करून घेण्याचे जे अनेक मार्ग शोधून काढलेले आहेत, त्यांपैकी अश्लील साहित्य, चित्रे, चित्रपट, नाटके यांच्याप्रमाणेच अपशब्द हाही एक असतो. जणू ते एक प्रकारचे वाङ्मैथुनच असते. ते पुष्कळच निरुपद्रवी असल्यामुळे त्याची दखल कोणी घेत नाहीत, एवढेच!

त्यामुळे भाषेचा सर्वांगीण अभ्यास करणाऱ्यांना अपशब्दांचाही अभ्यास करावा लागणार. अशा शब्दांचे एक वेगळे शास्त्रच असते. असे शब्द कसे निर्माण होतात, का निर्माण होतात, त्यांचा वापर कोण करतात, तो वापर शास्त्राला धरून होतो, की तो वाटेल तसा केला जातो, वेगवेगळे धर्म, जाती-जमाती, वर्ग यांच्यांकडून वापरल्या जाणाऱ्या अपशब्दांमध्ये कोणते फरक असतात, ते फरक का निर्माण

होतात, असे असंख्य प्रश्न समोर उभे राहतात; आणि मग अपशब्द किंवा ग्राम्यशब्द ही एक नाक मुरडून दुर्लक्ष करण्यासारखी गोष्ट नसून, तो गंभीर अभ्यासाचा विषय असल्याचे आपल्या लक्षात येते; म्हणूनच जेव्हा मी हिंदी, उर्दू, मराठीचे शब्दकोश तयार केले, तेव्हा अश्लील किंवा ग्राम्य किंवा ग्राम्य समजल्या जाणाऱ्या अपशब्दांचाही समावेश त्यात केला. त्याबद्दल म. म. दत्तो वामन पोतदार यांनी माझे कौतुक केल्याचे मला आठवते!

**म्हणींचे प्रभावसामर्थ्य**

ग्राम्यतेचे खरे प्रभावसामर्थ्य नुसत्या शब्दांपेक्षा ग्रामीण म्हणींवरून लक्षात येते. म्हणींचा वापर हा ग्रामीण लोकांच्या खास शाब्दिक भावाविष्काराचा प्रकार म्हटला पाहिजे. माझ्या आईच्या तोंडच्या काही म्हणी अजून माझ्या आठवणीत आहेत. उदाहरणार्थ, अनेकदा रागावून, सांगूनही जेव्हा आम्ही गप्प बसत नसू, तेव्हा ती चिडून म्हणायची,

"निसुकाच्या गांडीत घातला पाला, थंडसा लागतोय् आणि जरा घाला, अशी तुमची स्थिती आहे."

यातील 'निसुक' (निसुग) या शब्दाचा अर्थ 'निर्लज्ज, कोडगा' असा असल्याचे खूप उशिरा मला समजले. परंतु संदर्भाने तो अर्थ लहानपणीही कळत असे.

'भिडेभिडे पोट वाढे', 'मुंगीला मुताचा पूर', 'शास्त्र सांगे आणि चुलीपाशी हागे', 'आयजीच्या जिवावर बायजी उदार', 'आई तेली, बाप माळी, बेटे निकले सुभान अल्ली', 'गावाबरोबर गाढव खावं लागतं.' 'सांगितल्यापेक्षा केल्यालं बरं, केल्यापेक्षा मेल्यालं बरं', 'राजानं गू खाल्ला, तर तो औषधाकरिता आणि गरिबानं खाल्ला, तर तो मात्र पोटाकरता', 'मला हाणा, पण पाटलीण म्हणा', 'शाण्याचा गू तीन ठिकाणी', 'पाटलाच्या पोरीला न्हाण आलं अन् परटाचा पोर शेटं भादरतो', 'वर लुगडं, खाली उघडं', 'सोन्याची बुल्ली बघितली, की दगडाचा देव सुद्धा गांड फाकतो', 'बाप ठाऊक आईला, पाप ठाऊक मनाला', 'उंटाच्या गांडीचा मुका', 'शेटं भादरली, म्हणून मढं हलकं होत नाही', 'म्हैस आपल्या खाजेनं फळते, धन्याला दूध मिळावं, म्हणून नव्हे, 'मोठ्याच्या गांडीत शिरू नये, 'शंकर मारतो मुठाळ्या अन् नंदी म्हणतो, माझं लग्न करा', 'बोडकीला कुंकवाची उठाठेव कशाला?' 'भटो, बायको का कराना, तर म्हणे, बाई, तुम्हीच का व्हाना', 'एक तंगडे अन् शंभर

घोंगडे', 'गांडीत बोट घालू नये, घातलं तर हुंगू. नये, हुंगलं, तर सांगू नये, सांगितलं, तर तिथं राहू नये 'घरी आला संन्याशी (परदेशी), बाईला झाली विटाळशी', 'काळं केशर (शप्पे), पांढरा मध (वीर्य)', पाहुणी आली आणि म्होतुर लावून गेली.' 'जावयाचा पोर हरामखोर' अशा अनेक म्हणी गावात असताना व गावातून बाहेर पडल्यावर ऐकायला मिळाल्या. त्यातून एकच निष्कर्ष निघाला, की सुसभ्य, नागर भाषेपेक्षा ग्राम्य, असभ्य समजले जाणारे शब्द, वाक्प्रचार व म्हणी यांचा परिणाम ऐकणाऱ्यावर नक्कीच जास्त होतो. बोलणाऱ्यालाही आपण जोरदार वार केल्याचे समाधान मिळते.

काही म्हणींचे अर्थ चटकन् लक्षात येत नसत. अशा वेळी वडील माणसांकडून त्यांचे अर्थ समजावून घ्यावे लागत. उदाहरणार्थ, 'शाण्याचा गू तीन ठिकाणी' ही म्हण माझ्या एका वयस्कर नातेवाइकाने मला उद्देशून वापरली होती. पण मी तिचा अर्थ विचारला. तेव्हा तो म्हणाला,

"अंधारातून जाताना खेडवळ माणसाचा पाय गुवावर पडतो. तेव्हा तो जवळच्या दगडाला पाय घासून मोकळा होतो. पण तुझ्यासारखा शहरी शहाणा पायाला काय लागलंय्, ते पाहण्यासाठी त्या गुवाला बोटानं स्पर्श करतो; आणि त्याचा वास घेतो, तेव्हा त्याचा स्पर्श त्याच्या नाकाला होतो. अशा प्रकारे पाय, हाताचं बोट आणि नाक अशा तीन तीन ठिकाणी त्या गुवाचा स्पर्श होतो!"

अशीच एक म्हण आहे,'एक तंगडं अन् शंभर घोंगडं' तिचा अर्थ असा, की एका स्त्रीची (किंवा पुरुषाची) ऊब ही शंभर घोंगड्यांच्या उबेबरोबर असते.

रिकामटेकड्या माणसाचे वर्णन करताना शहरी माणसे 'नुसता माशा मारीत बसतो' असे म्हणतात. तर गावकडची मंडळी म्हणत, 'अंडावर लंड टाकून बसलेला असतो.' ते अधिक चित्रदर्शी असे.

त्याचप्रमाणे वृद्धत्वाच्या आगमनाची चाहूल सूचित करण्यासाठी लोक म्हणत असत. 'आता लंडातलं मूत अंडावर पडू लागलं.' हे वर्णन ग्राम्य असले, तरी वास्तवतादर्शक नक्कीच आहे.

**नवीन तयार होणारे वाक्प्रचार व म्हणी**

ग्रामीण लोकांच्या सहज बोलण्यातून नवनवीन वाक्प्रचार व म्हणी कशा तयार होतात, याची एक-दोन उदाहरणे नमूद करण्यासारखी आहेत. प्राथमिक शाळेत

असताना माझी मुंज झाली नसल्यामुळे आणि त्या वेळी चड्डीचा प्रचार नसल्यामुळे मी नुसताच सदरा व टोपी घालून शाळेत जाई. (माझे वय सुमारे आठ वर्षांचे असावे. मी तिसरीत होतो.) निगडे नावाच्या एका सत्यशोधक शिक्षकांना ते आवडले नाही. म्हणून त्यांनी मला दम दिला,

"ए भटुरग्या, उद्यापासनं लंगोट घालून आला नाहीस, तर गांडीत शेण घालीन."

त्यातून 'गांडीत शेण घालणं' हा एक वेगळाच वाक्प्रचार निर्माण झाला!

आमच्या गल्लीत एक उंडगी (बदफैली) बाई राहत होती. एकदा तिच्यावर एक चमत्कारिक प्रसंग गुदरला. कुणी छाकट्याने तिला आपल्या (किंवा सर्व्हिसच्या) मोटारीतून दूर गावाबाहेर नेले आणि तिच्याशी मजा मारून तिला तेथेच सोडून दिले. तिकडून परत आल्यावर ती साऱ्या गल्लीला आपले दुःख या शब्दात सांगू लागली. "जाताना गेलो मोटारीतनं येताना आलो चालत; म्यां तरी रांडनं व्हय का म्हणावं?" ज्यांनी उद्गार ऐकले, त्यांच्या दृष्टीने ती एक बोधप्रद म्हणच बनून गेली!

शाळेत असताना मुलांनी एक वेगळीच म्हण बनविली होती 'प्लीज' म्हणून एखाद्याकडे एखादी मागणी केली आणि त्याने ती नाकारली, तर तो मागणी करणारा म्हणे,

"अरे लेका, प्लीज म्हटलं, की मडमीण सुद्धा झगा वर करती, अन् तुला एवढी साधी गोष्ट देववत नाही?"

असाच एक गमत्या मुलगा होता. कुणी चिडून त्याला म्हटले की,

"भडव्या, तू काय समजतोस? तुझी गांड मारीन."

यावर तो शांतपणे म्हणे,

"खुशाल मार! कापून तर नेणार नाहीस?"

तर असा हा ग्राम्यतेचा प्रभाव! भाषा आणि वर्तन या दोन्ही बाबतींत ग्राम्यता ही झटका देऊन वठणीवर आणणारी असल्याचे आढळून येते. शरीरातील एखादा सांधा निखळला असला, तर जाणकार अस्थियुजा (बोनसेटर = हाडे बसविणारा) एका झटक्यात निखळलेले हाड पूर्ववत जाग्यावर नेऊन बसवितो. तीच गोष्ट ग्राम्यता करीत असते. त्या बाबतीतले तिचे सामर्थ्य अनुभवी व्यक्तीलाच कळते!

**श्री रघुवंश, केतकर मार्ग, पुणे ४११००४**

# सभास्थानीचे संकेत

**विजया देव**

सभा, चर्चा, परिसंवाद चालू असताना हटकून असे आढळून येते, की प्रत्येक वक्ता आपल्या भाषणाच्या सुरुवातीला व्यासपीठावरील प्रत्येकाचा नामनिर्देश करतो, श्रोत्यांना आवाहन करतो व मग आपले भाषण सुरू करतो.

माझ्यावर बोलायचा प्रसंग येतो, तेव्हा माझ्यापुरते मी असे ठरवून टाकले आहे, की ध्वनिवर्धकापुढे उभे राहिले, की मुद्द्याचे बोलायलाच सुरुवात करायची. कारण कार्यवाहांनी सभेला रीतसर, औपचारिक प्रारंभ करून दिलेला असतो, योग्य व्यक्तीच्या हाती सभेची सूत्रे सोपवलेली असतात. व्यासपीठावर कोण कोण आहे, याचा परिचय श्रोत्यांना करून दिलेला असतो. तेव्हा प्रत्येकाने उठून नव्याने या सर्वांना आवाहन करायची गरजच काय? आणि ही मंडळी तरी थोडीथोडकी असतात का? प्रमुख पाहुणे, अध्यक्ष, प्रमुख वक्ते, उद्घाटक, यांखेरीज आणखी कोणी मान्यवराची विशेष उपस्थिती आणि ज्यांच्या जिवावर व ज्यांच्यासाठी हे सर्व चालले आहे, ते श्रोते. निव्वळ वेळ जातो व निरर्थक पुनरुक्ती चाललेली असते, एवढेच सुचवण्यासाठी मी हे सांगत नाही. सभेचे निमित्त, विषय, वक्ते, क्रम यांविषयी प्रास्ताविक झाल्यावर दरवेळी स्वतःखेरीज प्रत्येकाचा नामोल्लेख वक्त्याने करणे कितपत उचित आहे?

याविषयी निश्चित नियम काय आहेत; आहेत, की नाहीत, याची मला कल्पना नाही. पण ही लांबण कंटाळवाणी आणि वेळखाऊ वाटते खरी. इतरांना हे जाणवत नसेल, असे नाही. पण हे उपचार पाळले नाहीत, तर तो औचित्यभंग ठरायचा, या भीतीपोटीही असे घडत असेल.

अथर्वशीर्षाची आवर्तने करतात, तेव्हा शांती म्हणायची पद्धत आहे. (ॐ भद्रं कर्णेभिः) ही शांती पहिल्या आवर्तनाच्या आणि शेवटच्या आवर्तनाच्या शेवटी म्हणतात. प्रत्येक आवर्तनाच्या सुरुवातीला व शेवटी म्हणत नाहीत. तीच गोष्ट याही बाबतीत मार्गदर्शक ठरेल का?

**'सुप्रिया', ६१।१४, एरंडवन, पुणे - ४११००४**

# 'काळा'तील निवडक निबंध

शि. म. परांजपे

सरकार लोकशिक्षणाचे काम करीत आहे; पण त्यांना ठेच लागलेली पाहून आपण शहाणे झाले पाहिजे आणि त्यांच्या चुका पाहून आपण आपल्या दिशेत बदल केला पाहिजे. असो. आता ही दिशा कशी बदलावयाची व खालच्या वर्गातील लोकांच्या शिक्षणासाठी इतरांनी काय करावयाचे, ह्याचा विचार करू.

लोकशिक्षणाच्या कामी सरकारचे प्रयत्न आजपर्यंत बहुतेक अंशी असे निष्फळ झाले आहेत, हे सांगितले. आता हेच काम हातात घेऊन त्यात यश मिळविणे हे लोकांना कसे करता येईल, ह्याचा विचार करावयाचा आहे. ज्या लोकांना शाळेत पाच पाच तासपर्यंत बसून वेळ फुकट दवडण्याला सवड नसेल, त्यांना अन्य तऱ्हेने शिक्षण देण्याला लोकांनी इत्युत्तर प्रारंभ केला पाहिजे. व जे शिक्षण शाळेच्या चार भिंतींच्या आत लोकांना मिळू शकत नाही, ते चावडीवर, चवाठ्यावर, किंवा देवळातून देण्यास सुरुवात झाली पाहिजे, स्वतः पुस्तके वाचावी; आणि शहाणे व्हावे, हा हल्लीच्या शिक्षणपद्धतीचा क्रम आहे. परंतु ज्ञान मनुष्याच्या मनात एकाच मार्गाने प्रवेश करिते, असे नाही. डोळ्यांनी ज्ञानाचे भारेच्या भारे कोणाच्या मनात वाहून आणून टाकले, तर कोणाचे मन उन्नत करण्याला कानही आपले दरवाजे उघडतात आणि ज्ञानाचा सारा ओघच्या ओघ हृदयात साठवून घेतात. ज्ञानसंपादन करण्याच्या कामात डोळे आणि कान ही दोन इंद्रिये इतर इंद्रियांपेक्षा मनुष्याला पुष्कळ अधिक मदत करितात. तरी पण त्यांतल्या त्यांत कानांची कामगिरी अल्प आयासाची आणि पुष्कळ फायद्याची असते. जेथे ज्ञान देण्याच्या कामी डोळे हातपाय टेकतात, तेथे कान पुढे सरसावून मनुष्याला ज्ञानसंपन्न करितात. डोळ्यांनी विद्यार्जन करावयाचे, म्हणजे अतिशय त्रासाचे वाटते, पण कर्णपुटाने ज्ञानामृत पिताना मनाला एक प्रकारचा आल्हादच होत असतो. ह्या व अशाच दुसऱ्या अनेक कारणांसाठी कानाच्या वाटेने ज्ञानाला हृदयमंदिरांत घेणे फार सोईचे झाले आहे. डोळ्यांनी एक पुस्तक एकटाच मनुष्य वाचू शकतो. पण कानांच्या साधनाचा उपयोग करावयाचा, असे म्हटले, तर एकाच वेळी एकच पुस्तक हजारो लोकांनाही वाचता येते. हायड्रॉलिक प्रेसप्रमाणे एकपट जोर एका बाजूला खर्च

केल्यास दुसऱ्या बाजूला त्याच्या किती तरी पटीने जोर उत्पन्न होतो. असे जर हे अद्भुत यंत्र परमेश्वराने आपल्या हातांत देऊन ठेविले आहे, तर त्याचा लोकशिक्षणाच्या कामी उपयोग न करणे हे रास्त होईल काय? कधीही होणार नाही. पूर्वीचे हरदास, पुराणिक, पोवाडे गाणार, तमासगीर, भजनी अभंग म्हणणारे साधुसंत, आणि उपदेश करणारे गुरू, हे ह्याच साधनांचा उपयोग करीत असत. तसा आपण हल्ली का करून घेऊ नये? ह्या जुन्या साधनांत आणखी काही नवीन साधनांचीही सुदैवाने भर पडली आहे. वर्तमानपत्रे आणि व्याख्याने ह्यांचा वर निर्दिष्ट केलेल्या दिशेने पुष्कळ उपयोग होण्यासारखा आहे. राष्ट्रातील प्रत्येक मनुष्याला आपले नाव लिहिता आणि वाचता येऊ लागले, तर चांगले खरे. पण निदान त्याला आपण पूर्वी कोण होतो, हल्ली कसे आहो, आपली स्थिती काय आहे, आपला राजा कसा आहे, आपला धर्म कोठे आहे, आपला देश कशात पडला आहे, इत्यादी गोष्टी कळणे अत्यंत जरूर आहे, व त्या त्याला हल्लीची वर्तमानपत्रे शिकवू शकतील. पण ती आडगावातील अशिक्षित लोकांना वाचता येत नाहीत. हल्लीच्या वर्तमानपत्रांच्या वाचनाबद्दलची अशी स्थिती बहुधा झालेली आढळते, की ज्यांची मने त्याच त्याच गोष्टी फिरून ऐकून अगदी निगरगट्ट बनून गेली आहेत, त्यांच्या घरी दररोज वर्तमानपत्रांच्या राशीच्या राशी येऊन पडतात, आणि आपल्या दुःस्थितीची हकीकत एकदा ऐकली, तरी ज्यांच्या मनाची तळमळ दहा दिवसही जावयाची नाही, अशा आडगावातील खालच्या प्रतीच्या लोकांच्या कानांवर त्या वर्तमानपत्रातील एक अक्षर चुकूनदेखील पडत नाही. ह्याला काही तरी उपाय योजणे अवश्य आहे. ज्यांना वर्तमानपत्रे वाचता येत नाहीत, त्यांना ती वाचून दाखविणारे कोणी नाहीत काय? आजपर्यंत नसले, तरी याच्या पुढे तरी निदान असे कोणी निघू शकणार नाहीत काय? आडगावात ज्यांना पंचांगाचे ज्ञान नाही, त्यांना 'आज पित्रे आहेत, उद्या दिवाळी आहे, परवा संक्रांत आहे', असे सांगणारे जोशी आढळतात. त्याचप्रमाणे त्याची स्थिती कशी आहे, हे सांगणारे जोशी कोणी निघू नयेत काय? हल्लीचे काही काही मराठी शाळेवरील मास्तर पाच पाच रुपयांवर सहा सहा तास पोरे हाकलण्याचे काम करीत असतात. त्यांनी आपल्या लोकशिक्षणाची दिशा बदलून 'ऊठ, बस, कर, मर', ही उदात्त तत्त्वे आपल्या छात्रवर्गाच्या मनावर ठसविण्याचे सोडून, देऊन दुसऱ्या काही नवीन मार्गाचे अवलंबन केल्यास स्वतःला पाच रुपड्यांपेक्षा अधिक द्रव्यप्राप्ती व दुसऱ्यांना 'ऊठ, बस' पेक्षा अधिक ज्ञानप्राप्ती होणार नाही काय?





अनुक्रमणिका

प्रत्येक आडगावातील लोकांना केव्हा तरी एकत्र जमवून त्यांना वर्तमानपत्रे (व इतर पुस्तकेही) वाचून दाखविण्याचा कोणी क्रम सुरू केल्यास त्यांत तो स्वार्थ आणि परमार्थ दोन्ही चालविणार नाही काय? दिवसाच्या कामधंदा आटपल्यावर रात्री प्रत्यकी दोन घटका जरी लोकांनी ह्यात मोडल्या, तरी त्या अनाठायी गेल्या, असे कधी होणार नाही. आडगावातील लोकांना एकत्र जमण्याला रात्रीची वेळ सोईची असते. तरी पण दिवसाही कधी कधी त्यांनी एकत्र जमावे. असल्या प्रसंगाला नेहमी धार्मिक महत्त्वाचे दिवस पसंत करणे इष्ट असते. 'आपण आदित्यवारी एकत्र जमू', ह्या वाक्यात हिंदूच्या मनाला काही अर्थबोध नाही. पण 'आपण एकादशीला देवळात जमू', किंवा 'शिवरात्रीच्या दिवशी नदीच्या काठावर जमू', ह्या वाक्यात भाविक हिंदूच्या मनाला समजणारा असा पुष्कळ अर्थ आहे. उपवासाचे दिवस मनुष्याच्या मनाला पवित्रपणा आणीत असतात, आणि त्यांच्या उदात्त विचारांना उत्तेजन देत असतात. हजारो वर्षांची आणि लाखो लोकांची धर्मश्रद्धा ह्या पवित्र दिवसांना पाठबळ देण्याला त्यांच्या मागे उभी असते. म्हणून जेथे दररोजचा प्रसंग साधत नसेल, तेथे असले तरी प्रसंग साधण्याचा अवश्य प्रयत्न केला पाहिजे. आडगावातील लोकांना एकत्र जमण्याला चावडी, किंवा पाटलाचे अंगण, किंवा देवळाचा सभामंडप, किंवा रानातले एखादे प्रशस्त मैदान ह्या जागा उत्तम होत. ह्या कामी लागणारा थोडाबहुत पैसा गावकऱ्यांनी जमवावा, परंतु ह्या कृत्याला बरीचशी मदत गावातील सावकारांकडूनच झाली पाहिजे. सावकार हेच आपल्या गावचे सरकार होत. त्यांनी जर उदार मनाने आणि सढळ हाताने गावच्या लोकांची मने आपणाकडे आकर्षण करून घेतली, तर मग ते काय करू शकणार नाहीत? इतके महत्त्व ज्यांच्यापासून आपल्याला मिळणार, त्यांच्यासाठी काही पैसे खर्च करणे हे सावकारांचे कर्तव्यकर्म आहे. परंतु अशा कामी त्याच्या सुशिक्षित बंधूंकडूनही त्यांना पुष्कळ मदत झाली पाहिजे. जेथे गरीब, अडाणी आणि अशिक्षित अशा लोकांना वाचून दाखविण्यासाठी वर्तमानपत्रे पाहिजे असतील, तेथे ती त्यांना फुकट मिळणे जरूर आहे. गिरणीतून मजूर सुटले, शाळांतून मुले बाहेर पडली, नदीच्या काठी स्नानाला बायकापुरुष जमा झाले, तीर्थाच्या ठिकाणी यात्रेकरू आले, कामधंदा आटपून शिळोप्याच्या गप्पा सांगण्याला चार लोक एके ठिकाणी बसले, म्हणजे त्या त्या ठिकाणी असले आखाडे असले पाहिजेत. पुष्कळ लोक चाकरी चाकरी करीत ह्या बंगल्यावरून त्या बंगल्यावर घिरट्या घालीत असतात. जर असले लोकशिक्षणाचे काम हाती घेऊन एखाद्या गावी ते वास्तव्य करून राहिले, तर साहेबाचे

दहा रुपये आणि पन्नास शिव्या ह्यांच्यापेक्षा काही जास्ती दरमहा त्यांना तेथे पडणार नाही काय? प्रत्येक गावोगावी अशा प्रकारच्या नद्या भरलेल्या असून व देवाने आपल्याला हात दिलेले असून आपली तहान दुसऱ्याच्या ओंजळीवर शहाण्या माणसाने काय म्हणून ठेवावी? पूर्वीच्या पद्धतीप्रमाणे पुराणिक लोक चातुर्मास्यात एक एक गावं आपल्या ताब्यात घेऊन तेथल्या लोकांना राजकीय, धार्मिक, सामाजिक वगैरे बाबतींत शिक्षण देत आलेले आहेत. त्या तत्त्वाचाच अंगीकार करून व त्यांत कालमानाप्रमाणे काही सुधारणा करून तोच क्रम पुढे चालवावयाचा आहे. लोकशिक्षणाच्या शाळेतील असिस्टंट मास्तर, हरिदास, पुराणिक, उपदेशक, बहुरूपी, तमासगीर, गारुडी, गाणी म्हणणारे भिक्षेकरी, बाळसंतोष, कानफाटे गोसावी, मनाचे श्लोक म्हणणारे वारकरी रामदासी, अभंग म्हणणारे वारकरी वगैरे अनेक आहेत. ह्याच्यापासूनही प्रस्तुत कार्याला पुष्कळ मदत होण्यासारखी आहे. पण त्यांचा विचार सध्याच नको.

# एक आयुष्यभराचा उद्योग

[**शुद्धलेखन-विवेक** : सुधारून वाढवलेले, सटीक, शासनमान्य नियम आणि सुमारे ६००० शुद्ध शब्दांचा कोश यांसह डॉ. द. न. गोखले. पुणे : सोऽहम् प्रकाशन, १९९३-९४; १६८ पृष्ठे. ९० रुपये.]

**परीक्षणलेखक : माधव ना. आचार्य.**

मराठीतील एक अव्वल दर्जाचे चरित्रकार म्हणून डॉ. द. न. गोखले ख्यातनाम आहेत. साहित्य अकादमीच्या पारितोषिकाने सन्मानित झालेल्या त्यांच्या '**डॉ. केतकर चरित्रा**' ने मराठी चरित्र वाङ्मयाला एक नवे वळण दिले. **डॉ. पटवर्धन ऊर्फ माधव ज्यूलियन** चरित्राने सर्जनशील प्रतिभेचा शोध घेतला. **स्वा. सावरकर : एक रहस्य** या चरित्रग्रंथाने मानसशास्त्राधिष्ठित व्यक्तित्वशोधाचा एक प्रयोग मराठी चरित्र-वाङ्मयाला सादर केला. तर **एका चरित्राचे चरित्र** या ग्रंथाने चरित्र-लेखन-प्रक्रियेचा शोध घेतला. त्यांचे हे सर्वच ग्रंथ विविध पारितोषिकांचेही मानकरी ठरले आहेत.

डॉ. गोखले यांच्या या सर्वज्ञात कार्याबरोबरच त्यांचा आयुष्यभराचा शुद्धलेखनविषयक उद्योग प्रस्तुत ग्रंथाद्वारे जिज्ञासूंच्या समोर येत आहे, ही अत्यंत आनंदाची बाब आहे.

प्रस्तुत ग्रंथाच्या प्रस्तावनेत या आपल्या शुद्धलेखनविषयक चिंतनाचे १९५५ ते १९९० मधील चार महत्त्वाचे टप्पे त्यांनी सांगितले आहेत. त्यांमधील तिसरा टप्पा १९८७ ते ८९ मधील आहे. यामध्ये त्यांनी 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके' मध्ये 'भाषाशोधन' या सदराखाली सहा लेख लिहिले. प्रस्तुत ग्रंथाचे हे पूर्वरूप म्हणायला हरकत नाही.

या ग्रंथामध्ये एकूण पाच प्रकरणे व तीन परिशिष्टे आहेत. पहिल्या चार प्रकरणांत शुद्धलेखनविषयक प्रश्नांची चर्चा थोड्या इतिहासमुखाच्या स्पर्शाने करण्यात आली असून पाचव्या प्रदीर्घ प्रकरणात शुद्धलेखनाचे 'परिवर्धित नियम' चिकित्सेसह

दिले आहेत. परिशिष्टांपैकी पहिल्यामध्ये सुमारे सहा हजार शुद्ध शब्दांची जंत्री पूर्वप्रकरणातील नियमांच्या संदर्भासह दिलेली आहे. उरलेल्या दोन परिशिष्टांत परिवर्धित नियमांसह महामंडळाचे नियम येतात व विषयसूची येते.

चर्चेसाठी योजलेल्या पहिल्या प्रकरणचतुष्टयामध्ये--शुद्धलेखनाची आधारभाषा, त्याचे निकष, त्याच्या नियमांच्या मर्यादा व त्या नियमांची अनुगामी नवरचना या प्रश्नांचा विचार येतो.

डॉ. गोखले यांच्या ग्रंथाची रूपरेषा लक्षात घेतल्यानंतर त्याच्या अंतरंगपरिचयाकडे वळायला हरकत नाही.

'शुद्धलेखन आणि प्रमाण-भाषा' या पहिल्या प्रकरणात आरंभीच शुद्धलेखनाच्या आजवरच्या सुधारणा-प्रयत्नांची स्थूल नोंद करून डॉ. गोखले म्हणतात,

'आतापर्यंत शुद्धलेखनाविषयी जे जे नियमसंच तयार झाले, त्यांत प्रमाणभाषा हा शब्द आलेला दिसत नाही.' (पृ. २)

त्यांच्या मते, 'प्रमाणभाषा हाच कोणत्याही शुद्धलेखनविषयक नियमसंचाचा आधार असतो.'

'प्रमाणभाषा' या शब्दाने आपल्याला काय अभिप्रेत आहे, हे सांगताना डॉ. गोखले लिहितात,

'. . . प्रमाणभाषा हे भाषेचे एक रूप आहे. सभासंमेलने, परिषदा, अधिवेशने इत्यादींत; दैनिके, साप्ताहिके, मासिके, पुस्तके, ग्रंथ, इत्यादींत आणि आकाशवाणी, दूरचित्रवाणी, विधिमंडळे, कायदेकानू, वगैरेंमध्ये परस्परसंपर्कासाठी प्रमाणभाषा बहुतकरून वापरली जाते. प्रमाणभाषेमुळे स्थानिक, वर्गीय, जातीय वगैरे संकुचित भाषारूपे वापरणारे लोक सहज एकमेकांशी संपर्क साधू शकतात'. (पृ. ३)

शुद्धलेखनाच्या आधारभाषेच्या संदर्भातील डॉ. गोखल्यांचे हे प्रमाणभाषालक्षण महत्त्वाचे आहे. कोणत्याही भाषेमध्ये एकाच काळी काही दैशिक व स्तरभेद अस्तित्वात असतातच. प्रमाणभाषा ही या भेदांना सामावून घेऊन पलीकडे गेलेली असल्यामुळे तिचे आकलनक्षेत्र सापेक्षतः व्यापक असते. शुद्धलेखननियमांचा आधार शोधताना म्हणूनच दैशिक वा स्तरभेद लक्षात न घेता प्रमाणभाषेकडे वळावे लागते. 'प्रमाणभाषा' असा शब्दप्रयोग केला, की भाषेची अन्य रूपे 'अप्रमाण' असतात काय, असा प्रश्न संभवतो. डॉ. गोखले यांनी त्याला उत्तर देताना प्रमाणभाषेच्या व्यापक संपर्कक्षेत्राचा उल्लेख केला आहे. (पृ. ८) प्रस्तुत गैरसमज टाळण्यासाठी म्हणूनच असे म्हणता येईल, की

'प्रमाणभाषा' या शब्दातील पूर्वपद मूल्यवाचक नसून केवळ वर्णनात्मक आहे.

ही प्रमाणभाषाच व्याकरणाचीही आधारभाषा असते; कारण ती समाजातील सर्व घटकांना एकत्र आणते, विचार व भावना यांच्या अभिव्यक्तीच्या बाबतीत एक जाण उत्पन्न करते. व्याकरण या प्रमाणभाषेचे रूपवर्णन करते. या प्रमाणभाषेची लेखनसरणी म्हणजे शुद्धलेखनाचे नियम. म्हणूनच व्याकरण व लेखनसरणी यांचे प्रमाणभाषेशी समांतर परंतु स्वतंत्र संबंध असतात. या वस्तुस्थितीची जाण डॉ. गोखले यांनी वेगळ्या संदर्भात सूचित केलीच आहे. (पृ. १५)

'शुद्धलेखनाचे विविध निकष' या दुसऱ्या प्रकरणात प्रमाणभाषेव्यतिरिक्त असलेल्या शुद्धलेखनाच्या अन्य निकषांची सविस्तर चिकित्सा केलेली असून शेवटी प्रमाणभाषा या निकषावर येणाऱ्या आक्षेपांचेही निराकरण केले आहे. या अन्य निकषांमध्ये उच्चार, शिष्टांचे सभोचित भाषण, व्युत्पत्ती, व्याकरण-परंपरा, लोकव्यवहार, मान्य ग्रांथिक प्रयोग, उपयुक्तता व भाषेचा स्वभाव यांची चिकित्सा डॉ. गोखले यांनी केली आहे. प्रमाणभाषा या अंतिम निकषावर येणाऱ्या आक्षेपांचे निराकरण करताना त्यांनी प्रमाणभाषेच्याही परिवर्तनाचा उल्लेख केला आहे. परंतु ही परिवर्तित रूपे शुद्धलेखनात समाविष्ट होण्याची प्रक्रिया अन्य अनेक घटकांवर अवलंबून असल्यामुळे प्रमाणभाषेत अशुद्ध रूपे शिरण्यास प्रतिबंध येतो, असे त्यांचे प्रतिपादन आहे. (पृ. २२) हे लक्षात घेऊनच ते पूर्वोक्त अन्य निकषांचा उल्लेख अंतिम निकषाचे 'पूरक वा उपोद्बलक निकष' म्हणून करतात. (पृ. २२)

डॉ. गोखले यांना प्रमाणभाषेविषयी जे म्हणावयाचे आहे, त्या संदर्भात असेही म्हणता येईल, की परिवर्तन हा जीवनाचा म्हणूनच भाषेचाही स्वभाव आहे. परंतु परिवर्तनाच्या बरोबरीनेच परंपरेचे एक सातत्य टिकवून ठेवणे हाही जीवनाचा व भाषेचाही स्वभाव आहे. परिवर्तनाचे नियोजनबद्ध नियमन करून, परंपरा नष्ट न करता विकास शक्य असतो. शुध्दलेखनाचे नियम हे एक प्रकारचे नियोजनच आहे.

प्रमाणभाषेच्या निकषत्वावर येणारा दुसरा आक्षेप व्यावहारिक दृष्ट्या महत्त्वाचा आहे. एखादे रूप शुद्ध, की अशुद्ध हे प्रमाणातील रूपांवरून ठरविताना संदेह निर्माण झाल्यास काय करणार? आक्षेप नोंदवून डॉ. गोखले म्हणतात. 'आधीच मराठीत शब्दकोश दुर्मीळ ..शिवाय कोशकार शिष्ट शब्दांचीही अनेक रूपे नोंदतात ...त्यामुळे ग्राह्यरूप कोणते, हे कोशावरून कळत नाही'. (पृ. २० - २१) अर्थात डॉ. गोखले ह्यांनी म्हटल्याप्रमाणे शुद्धलेखनदृष्ट्या ग्राह्याग्राह्य रूपांची नोंद करणे हे कोशकाराचे

कार्यच नव्हे. म्हणूनच त्यासाठी भाषेच्या नियोजनाचा वर उल्लेख केला. डॉ. गोखले यांनी परिशिष्टात दिलेला शुद्ध शब्दकोश हा या नियोजनाचाच एक प्रकार आहे.

'शुद्धलेखनाच्या नियमांच्या मर्यादा' या तिसऱ्या प्रकरणात डॉ. गोखले ह्यांनी अनेक व्यावहारिक व भाषिक मर्यादा नोंदल्या आहेत. शुद्धलेखननियमांची लवचिकता व त्यांच्या सर्वांगपरिपूर्णतेचा अभाव यांमुळे त्या नियमांच्या क्षेत्राचा विस्तार वा संकोच केला जातो. नियम कुणासाठी, यावरही त्यांची परिपूर्णता वा अपूर्णता अवलंबून असते. भाषा ही परिवर्तनशील असल्यामुळेही नियमांना मर्यादा पडतात. भाषेतील परिवर्तन हे नेहमीच मुक्त असते. त्यामुळे पूर्वस्थितीवरून भावी रूपांचा अंदाज बांधता येत नाही. 'एकमुखी तार्किक संगतीचा अभाव' ही डॉ. गोखले यांनी नोंदलेली शुद्धलेखननियमांची मर्यादा त्यामुळेच संभवते. 'शुद्ध' या शब्दाची अर्थमर्यादाही डॉ. गोखले यांनी स्पष्ट केली आहे. हा शब्द भाषेच्या कोणत्याही व्यवहारात केवळ प्रवृत्तिवर्णनात्मक असतो. त्याचा सामाजिक दर्जाशी काहीही संबंध नाही.

'नवरचना, की सुधारणा?' या चौथ्या प्रकरणात सुधारणेच्या 'पुरोगामी' व 'अनुगामी' या दोन प्रकारांची चर्चा गोखल्यांनी केली आहे. 'कोणतीही नवीन, अल्पवयीन, संबंधितांच्या पचनी न पडलेली, बहुजनांच्या विरोधात उभी असणारी व त्यांच्या फार पुढे जाऊन त्यांना नवी वाट काढून देण्याची उमेद बाळगणारी सुधारणा, ती पुरोगामी'; तर 'संबंधितांच्या पचनी पडलेली व काही लोकांना अनुकूल करून घेण्याचे कार्य करणारी, ती अनुगामी'. (पृ. ३४) उदा. , "एके काळी विधवाविवाह ही पुरोगामी सुधारणा होती; आता ती अनुगामी झाली आहे . . . सावरकरी 'अ' ची बाराखडी ही प्रारंभकाळात पुरोगामी सुधारणा होती; आता तिला अनुगामी म्हणता येईल". (पृ. ३४)

डॉ. गोखले यांनी शुध्दलेखनातील पुरोगामी सुधारणांचे जे अन्य नमुने सादर केले आहेत, त्यांपैकी एक असा 'मठ्ठ, सख्खा' इ. शब्दांचा उच्चार मट्ठ, सक्खा असाच होतो. तेव्हा मट्ठ, सक्खा, विट्ठल वगैरे लेखन शुद्ध समजावे'. (पृ. ३९)

या नमुन्याविषयी थोडी माहिती येथे नोंदायला हरकत नाही. डॉ. गोखले यांनी पुरोगामी म्हणून सादर केलेला हा नमुना प्रथम प्रा. मंगरूळकर-अर्जुनवाडकर लिखित 'मराठीः घटना, रचना, परंपरा' (१९५८) या ग्रंथातील संयुक्त वर्णांच्या उच्चारात नोंदलेला आहे. त्याला अनुसरून उपर्युक्त शुद्धलेखन सूचना मात्र प्रा. अर्जुनवाडकरांनी १९८७ मध्ये मुंबई विद्यापीठाच्या व्याकरण, शुद्धलेखन सत्राच्या वेळी सादर केलेल्या





अनुक्रमणिका

'महामंडळ शुद्धलेखन सुधारणा' पत्रकात केली होती. ('ललित' ऑक्टो. , १९८५ मासिकात 'पंतोजी' या टोपणनावाने 'ग म भ न' सदरात लिहितानाही प्रा. अर्जुनवाडकरांनी ही सूचना केली होती.) महाप्राण व्यंजनांचे द्वित्त होताना एक अल्पप्राण होते, ही भाषेतील एक सामान्य प्रवृत्ती येथे दिसते. उत्थान, शुद्ध, क्रुद्ध, इत्यादी शब्दांच्या लेखनात ती अनुसरलीही जाते. मग अनुगामी सुधारणा म्हणून तिचा समावेश का होऊ नये?

डॉ. गोखले यांच्या मते आज साहित्य महामंडळाचे जे नियम रूढ आहेत, त्यांच्यामधे अनुगामी सुधारणांना वाव आहे. (पृ. ३८) त्यामुळे त्या दिशेने केलेले प्रयत्न असेच त्यांच्या पुढच्या विस्तृत प्रकरणाचे स्वरूप आहे. त्याविषयी या प्रकरणात ते म्हणतात,

"महामंडळाचे शासनमान्य शुद्धलेखन सध्या प्रचलित असल्यामुळे त्यात अनुस्यूत असणाऱ्या सुधारणा अनुगामी आहेत, असे बिनधोक समजता येईल. म्हणून त्या सुधारणा गृहीत धरून पुढील प्रकरणात 'सुधारून वाढविलेले' महामंडळाचे शासनमान्य नियम तपशीलवार दिले आहेत. हे सुधारून वाढविलेले नियम मान्य करण्यास नि अमलात आणण्यास महामंडळाने किंवा शासनाने हरकत घेण्याचे काहीच कारण दिसत नाही". (पृ. ३८)

प्रस्तुत ग्रंथातील शेवटचे पाचवे प्रकरण हे एका दृष्टीने गाभ्याचे प्रकरण आहे. (म्हणूनच पहिल्या चार प्रकरणांना ४३ पृष्ठे, तर प्रस्तुत पाचव्याला ६० पृष्ठे देण्यात आलेली आहेत.) 'परिवर्धित नियम' नामक या प्रकरणात महामंडळाचे शासनमान्य नियम सुधारून वाढविलेले आहेत. 'परिवर्धित' म्हणजे 'परिष्कृत व वर्धित' असेही स्पष्टीकरण ते देतात. (पृ. ४५)

मराठी साहित्य महामंडळाच्या शुद्धलेखन नियमावलीत मुळात १८ नियम आहेत. डॉ. गोखले यांच्या या परिवर्धित नियमावलीत ४४ नियम आहेत. अर्थात या सर्व अनुगामी सुधारणा असल्यामुळे 'शुद्धलेखनाची सर्वसामान्य उद्दिष्टे व महामंडळाची उद्दिष्टे यांच्याशी जास्तीत जास्त एकनिष्ठ राहिलो असण्याचा' त्यांचा दावा (पृ. १०३) योग्यच आहे.

तर्कसंगतीबरोबरच आकलनसुलभता हे डॉ. गोखले यांच्या विवेचनाचे वैशिष्ट्य आहे. त्याला अनुसरूनच प्रस्तुत प्रकरणातील नियमावलीच्या आरंभी ते सर्व व्याकरणिक संज्ञांचे स्पष्टीकरण देतात. जोडाक्षरे, शब्द जोडण्या-तोडण्याच्या पद्धती, शिरोबिंदूचा

उच्चार व लेखन, शब्दाच्या अखेरच्या अक्षराचे लेखन, विभक्तिप्रत्यय, तत्सम व तत्समेतर शब्द, विरामचिन्हे, पद्यातील लेखन - असा शुध्दलेखनाचा अवघा प्रपंच बारीकसारीक माहिती व सूचनांसह वळवण्याचा प्रयत्न डॉ. गोखले यांनी या प्रकरणात केला आहे. भाषेतील प्रवृत्तींचे सूक्ष्म निरीक्षण, त्याला दिलेली तर्कशुद्ध वर्गीकरणाची जोड आणि हे सर्व सोपे करून सांगणारी शिक्षकांची वृत्ती यांचा सुरेख संगम या प्रकरणात झाला आहे. महामंडळाच्या आजच्या रूढ नियमांतील अपुरेपणा दूर करणे, त्यांतील संदिग्धता नष्ट करणे, अस्पष्ट भागाची दखल घेणे, तत्समेतरमधील अस्पष्ट सीमारेषा लक्षात घेऊन व भाषेच्या परिवर्तनशील स्वभावाला अनुसरून त्यांची व्यवस्था लावणे आणि नियममुक्त लेखनाचाही अनेक उदाहरणांसह निर्देश करणे – अशी या प्रकरणाची अनेक वैशिष्ट्ये सांगता येतील.

उपर्युक्त वैशिष्ट्यांपैकी नियममुक्त लेखनाविषयीचे डॉ. गोखले यांचे सोदाहरण विवेचन हा या प्रकरणातील भाग उल्लेखनीय आहे. कारण यामध्ये भाषेच्या स्वभावाचा शुद्धलेखनातील व्यावहारिक अडचणींचा विचार अनेक अंगांनी केला आहे. महामंडळाच्या रूढ १८ नियमांचे आणखी काही परिवर्धित नियमांत स्पष्टीकरण दिल्यानंतरही व्यवहारात यापलीकडे जे शिल्लक राहते, त्याची येथे ते दखल घेतात. तिसऱ्या प्रकरणात शुद्धलेखन नियमसंचांचा जो अपुरेपणा त्यांनी नोंदला आहे, त्याचे सोदाहरण स्पष्टीकरण येथे मिळते.

शेवटच्या परिशिष्टांपैकी पहिले 'शुद्ध शब्दकोश' हे प्रस्तुत ग्रंथातील महत्त्वाचे परिशिष्ट आहे. १९७४ मध्ये त्र्यं. रा. दामले व सुधा वि. अर्जुनवाडकर यांनी 'मराठी शुद्ध शब्द सूची' नामक एक २३ पानी पुस्तिका प्रसिध्द केली होती. तीमध्ये सुमारे १५०० शब्द दिलेले. आहेत. तिचा बव्हंश भर संस्कृत तत्सम शब्दांवर आहे, व प्रामुख्याने ती मुद्रकांच्या सोयीसाठी तयार केलेली आहे. श्री. मो. रा. वाळंबे यांना 'मराठी शुद्धलेखन प्रदीप' मध्ये १९८१ च्या पहिल्या आवृत्तीत सुमारे ३९०० शुद्ध शब्दांची सूची दिली आहे; १९८६ च्या दुसऱ्या आवृत्तीत तीमध्ये आणखी १२०० शब्दांची भर घातलेली आहे. या सूचीचाही भर तत्सम शब्दांवरच आहे. डॉ. गोखले यांच्या प्रस्तुत ग्रंथातील सूची ६००० शब्दांची आहे. तिचे महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे, प्रत्येक शब्दापुढे पूर्वप्रकरणातील परिवर्धित नियमाचा अंक टाकून, एखादा शब्द शुद्ध का, याची कारणमीमांसा पाहण्याची सोय आहे. पाचव्या प्रकरणातील नियममुक्त क्षेत्राच्या विचाराला अनुसरून या सूचीमध्ये काही शब्दांच्या रूढ विकल्पांचीही नोंद आहे.

श्री. मो. रा. वाळंबे यांचा उपर्युक्त ग्रंथ शुद्धलेखनविषयक दोन-तीन स्तरांना स्पर्श करणारा आहे. पाठपद्धतीचा अवलंब करून शुद्धलेखननियमांचे मार्गदर्शन, भाषाशुद्धीच्या अभ्यासकाला उपयोगी पडेल, अशी माहिती व व्यावहारिक दृष्ट्या उपयोगी असा शुद्ध शब्दकोश अशा दोन-तीन पातळ्यांमुळे श्री. वाळिंबे यांचा ग्रंथ वैशिष्ट्यपूर्ण ठरला आहे. डॉ. गोखल्यांच्या प्रस्तुत ग्रंथापेक्षा त्याचे प्रयोजन व तत्सापेक्ष उपर्युक्त स्वरूपच वेगळे आहे. त्यामुळे शुद्धलेखनाच्या तात्त्विक चर्चेवर त्यात भर नाही; उलट, डॉ. गोखले यांच्या ग्रंथाचे तेच महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. शिवाय हे तात्त्विक विवेचन करताना त्यांनी भाषाव्यवहार कुठेही नजरेआड होऊ दिलेला नाही. महामंडळाचे रूढ नियम सांभाळूनच ते नवे नियम बांधतात; त्यामुळे परंपरा व नवता यांमधील साक्षेपही चांगला सांभाळला जातो. अतएव ग्रंथ मन:पूर्वक स्वागतार्ह!

**मु. व पोस्ट : चौल, ता. अलिबाग; जि. रायगड. ४०२२०३**

## सत्यं वर धर्मं चर . . .

राहुल सांकृत्यायन यांनी **मेरी जीवन-यात्रा** लिहिली आहे (चार भागांत, १९४४, १९५१, १९५६, १९५६). त्यावर शिरोवचन म्हणून त्यांनी दिले आहे, ते असे :

'बेडे की तरह पार उतरने के लिये मैं ने विचारों को स्वीकार किया, न कि सिर पर उठाये-उठाये फिरने के लिये'. (बेडा=तराफा)

या वचनाचा आधार म्हणजे गौतम बुद्धाने दिलेला तराफ्याचा दृष्टांत (त्रिपिटक : सुत्तपिटक : **मज्झमनिकाय** : २२ : ४ : ९ कुल्लूपमं धम्मदेसना).

भिक्षूंनो, समजा, एखाद्या माणसाला रस्त्याने जाताना एक मोठा जलाशय लागला. त्याचा ऐलतीर धोक्याचा आणि भीतिदायक आहे आणि पैलतीर सुरक्षित आणि आश्वासक. हाताशी ना होडी आहे, ना जवळ पूल आहे. मग त्याने गवत, फांद्या, वेली वगैरेंचा एक तराफा बनवला आणि तो पलीकडे गेला. आता जर तो माणूस म्हणू लागला, किती उपयोगी पडला हा तराफा! याच्याच मदतीने मी इथवर आलो, आता याला टाकून उपयोगी नाही, यालाच आपण खांद्याडोक्यावर घेऊन पुढचे मार्गक्रमण केले पाहिजे'. तर त्याला तुम्ही काय म्हणाल? त्याचे हे करणे शहाणपणाचे म्हणाल का? --

भिक्षू नाही म्हणतात.

बुद्ध पुढे म्हणतो :

उघडच आहे, की त्याने तो तराफा सोडून द्यायला पाहिजे, अशीच गोष्ट मी तुम्हांला दिलेल्या 'धम्म'रूपी तराफ्याची आहे. धम्म हे जीवनाच्या समस्यांमून पार होण्यासाठी कामी येणारे साधन आहे, ती डोक्यावर घेऊन फिरायची गोष्ट नाही.

# निवेदन
## महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ

### नवलेखक अनुदान योजना

नवलेखकांना उत्तेजन मिळावे, म्हणून त्यांच्या प्रथम व द्वितीय पुस्तकाच्या प्रकाशनार्थ अनुदान देण्याची 'नवलेखक अनुदान योजना' महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या वतीने कार्यान्वित करण्यात येत असून, या योजनेखाली सन १९९३ - ९४ चालू आर्थिक वर्षासाठी नवलेखक/कवींकडून साहित्य मागविण्यात येत आहे. नवलेखक/कवी या संज्ञेत ज्याचे एकही पुस्तक प्रकाशित झालेले नाही किंवा ज्याचे पहिले पुस्तक मंडळाच्या या योजनेतील अनुदानाने प्रकाशित झाले आहे, अशाच नवलेखक/कवींचा समावेश करण्यात येतो. या योजनेत नवलेखक/कवींनी त्यांची पुस्तके स्वतः पाठविताना किंवा नवलेखक/कवींची पुस्तके प्रकाशकांनी पाठविताना पुढील गोष्टी कृपया लक्षात घ्याव्यात :-

(१) या योजनेखाली वर उल्लेखिलेल्या नवलेखक/कवींच्या प्रथम व या योजनेतील अनुदानाचे ज्याचे पहिले पुस्तक प्रकाशित झाले आहे, त्याच लेखकाच्या द्वितीय पुस्तकाच्या प्रकाशनार्थ अनुदान देण्यात येते.

(२) या नवलेखक अनुदान योजनेत अनुदानासाठी सादर करावयाच्या अर्जासोबत संबंधित नवलेखकाने/कवीने त्याच्या छायाचित्रांसह राजपत्रित अधिकारी, महाविद्यालयाचे प्राचार्य व प्राथमिक/माध्यमिक शाळेचे मुख्याध्यापक यांपैकी एकाचे ओळख दर्शविणारे प्रमाणपत्र संस्थेच्या शिक्क्यासह सादर करणे आवश्यक आहे. लेखक/कवीने हे ओळख प्रमाणपत्र आपल्या अर्जासोबत न पाठविल्यास त्याचा अर्ज विचारात घेतला जाणार नाही.

---

(मागील पानावरून चालू)

बौद्ध वाङ्मयाचे परिशीलन करताना या दृष्टांताने राहुलजींना आकृष्ट केले. बुद्ध हा असा माणूस आहे, की ज्याला सत्याची सर्वप्रथम चाड आहे. आपल्याच विचारांचा बडेजाव माजवण्याची त्याची वृत्ती नाही, असे त्यांच्या लक्षात आले.





अनुक्रमणिका

(३) काव्य, नाटक/एकांकिका संग्रह, कादंबरी, लघुकथा, ललितगद्य, बालकुमार साहित्य या कोणत्याही प्रकारातील वाङ्मय असावे आणि ते १ ऑक्टोबर, १९९३ पर्यंत मंडळाकडे पाठवावे. त्यानंतर पाठविलेले हस्तलिखित पुढील वर्षात विचारात घेतले जाईल. वैचारिक स्वरूपाचे हस्तलिखित विचारात घेतले जाणार नाही.

(४) लेखक/कवीने मंडळाकडे हस्तलिखित पाठवताना त्यात आपले नाव, पत्ता किंवा अन्य तऱ्हेने त्यांची ओळख पटेल, असा मजकूर लिहू नये. तज्ज्ञ-परीक्षकांकडे हस्तलिखित अभिप्रायासाठी पाठवताना लेखकाचे नाव, पत्ता वगैरेबद्दल मंडळ गोपनीयता राखते. मात्र मंडळास हस्तलिखित सादर करताना लेखक/कवीने आपले नाव, पत्ता, हस्तलिखिताचे शीर्षक, वाङ्मयप्रकार यांबद्दलचा तपशील एका वेगळ्या कागदावर लिहून तो हस्तलिखितासोबत पाठवावा. लेखक/कवीचे एक पुस्तक मंडळाच्या अनुदानातून आधी प्रकाशित झाले असल्यास त्याचा तपशील कळवावा.

(५) पुस्तकाची मुद्रणप्रत हस्तलिखित स्वरूपात असल्यास ती पानाच्या एकाच बाजूस व सुवाच्य अक्षरात लिहिलेली असावी. मुद्रणप्रत टंकलिखित, चक्रमुद्रित किंवा झेरॉक्स केलेली असल्यास, पानाच्या एकाच बाजूस व स्पष्ट असावी. तसेच कात्रणे असल्यास, ती कागदावर एकाच बाजूस क्रमाने व्यवस्थित चिकटविलेली असावीत. हस्तलिखित अशुद्ध असल्यास व त्यातील मजकूर वाचता येण्याजोगा नसल्यास हस्तलिखिताचा विचार केला जाणार नाही.

(६) मुद्रणप्रत मंडळास मिळाल्यानंतर त्याची पोच दिली जाईल व त्यानंतर योग्य वेळी अनुदानाबद्दल निर्णय कळविला जाईल. मंडळाकडे आलेली हस्तलिखिते तज्ज्ञ-परीक्षकांकडे पाठवली जातात. त्यांचा अभिप्राय अनुकूल असला, तरच हस्तलिखितास अनुदान देण्याबाबत मंडळ निर्णय घेते. त्याबाबतचा निर्णय कळविला जाईपर्यंत निष्कारण पत्रव्यवहार करू नये. हस्तलिखिताबद्दलचा निर्णय एप्रिल अखेरपर्यंत कळवला जाईल.

(७) अनुदानास पात्र ठरलेल्या साहित्यात तज्ज्ञांच्या अभिप्रायानुसार काही फेरफार आवश्यक वाटल्यास ते करून, स्वच्छ मुद्रणप्रत तयार करून देण्याची जबाबदारी लेखकाची राहील. ही सुधारित प्रत मंडळाच्या हाती आल्यानंतरच अनुदानासंबंधीचा अंतिम निर्णय घेण्यात येईल.

(८) अनुदानास पात्र न ठरलेली मुद्रणप्रत किंवा या योजनेच्या नियमात न

बसणाऱ्या पुस्तकाची मुद्रणप्रत लेखक/कवीस परत हवी असल्यास तीन महिन्यांच्या मुदतीत मंडळाच्या कार्यालयातून न्यावी लागेल. लेखक/कवींना मुद्रणप्रत रजिस्टर पोस्टाने हवी असल्यास आवश्यक त्या रकमेची पोस्टाची तिकिटे आधीच पाठवावी लागतील.

(९) स्वीकृत साहित्याच्या संपादनाचे व पहिल्या आवृत्तीच्या प्रकाशनाचे सर्व अधिकार मंडळाकडे राहतील.

(१०) मुद्रणप्रत दोन प्रतींत असावी व तिची एक प्रत खालील पत्त्यावर पाठवावी व दुसरी प्रत नवलेखक/कवीने स्वतःकडे ठेवावी. मुद्रणप्रत गहाळ झाल्यास त्याची जबाबदारी मंडळावर राहणार नाही.

अनुदानासाठी नमुना-अर्ज व माहितीपत्रक मागविणे तसेच हस्तलिखिते पाठविण्यासाठी पत्ता खालीलप्रमाणे

सचिव,

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ,

एन्सा हटमेंट, 'डी' ब्लॉक, आझाद मैदान, महापालिका मार्ग, मुंबई - ४०० ००१.

## परिषद-वार्ता

मराठी अभ्यास परिषदेच्या वतीने प्रतिवर्षी मराठीतील सर्वोत्कृष्ट भाषाविषयक लेखनास बँक ऑफ महाराष्ट्र या संस्थेने पुरस्कृत केलेले **'महाबँक पारितोषिक'** दिले जाते. १९९३ सालातील पारितोषिकासाठी प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर यांच्या **मराठी व्याकरणाचा इतिहास** या ग्रंथाची निवड करण्यात आली आहे.

हे पारितोषिक प्रा. अर्जुनवाडकर यांना शनिवार दिनांक ३० ऑक्टोबर १९९३ रोजी, आगामी मराठी साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष प्राचार्य राम शेवाळकर यांच्या हस्ते दिले गेले.

## असेही असू शकते लोकशिक्षण!

पुणे. दि. पंधरा ऑगस्ट एकोणीसशे ब्याण्णव

सप्रेम नमस्कार

विवाह
आयुष्यभराचा एक साथीदार निवडणं
आणि सहजीवनाची सुरवात करण.
ही खरंतर कितीतरी नैसर्गिक
आणि सहजसुंदर गोष्ट.
पण

लग्न म्हटलं की हुंडा, मानपान, देणी-घेणी, आहेर,
पत्रिका, मुहूर्त, अर्थशून्य कर्मकांडे, कालबाह्य संस्कार,
दागिन्यांचा चमचमाट, श्रीमंतीचं प्रदर्शन, रुसवे - फुगवे,
जेवणावळी आणि ऐपत असो वा नसो
हौस-मौज या सदराखाली होणारी अमाप उधळपट्टी.
या सर्वात त्यामागच्या निखळ आनंदालाच आपण मुकतो.

म्हणूनच या सर्व नव्या-जुन्या अनिष्ट प्रथा टाळून
दि. १५ ऑगस्ट १९९२ रोजी आम्ही दोघे
नोंदणी पद्धतीने आणि साधेपणाने विवाहबध्द झालो.

कोणत्याही चांगल्या कामासाठी
आपल्या सदिच्छा नेहमी आमच्या पाठीशी असतातच.

असाच लोभ रहावा ही विनंती . . . कळावे.

आपले नम्र,

मिलिंद दत्तात्रय जोशी,
१४।२, संचेती-भंडारी कन्स्ट्रक्शन,
१०।२ अ, अनुपमपार्क, कोथरूड,
पुणे - ४११ ०२९.

सुनीती राजाराम लिमये
गुणगौरव सोसायटी,
८४३, सदाशिव पेठ,
पुणे - ४११ ०३०.





अनुक्रमणिका

**पैसे भरण्याबद्दल सूचना**

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनीऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम, आणि ती कशापोटी पाठवली, ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास, कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठवली जाईल.

**पत्रिकेची वर्गणी**

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील, हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते :

चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद-वर्गणी धरून) वर्षाला ४० रुपये.

चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यांसाठी वर्षाला ६० रु.

सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील वर्षांपैकी असो) १५ रु.

परदेशातील व्यक्तींसाठी वर्षाला १० डॉलर.

परदेशातील संस्थांसाठी वर्षाला १५ डॉलर.

सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ४ डॉलर इतकी पडेल.

**परिषदेची वर्गणी**

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिली आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला, तर इतर सभासदांनी केवळ २० रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ, एका घरात दोन सभासद आणि अंक एक अशी स्थिती असल्यास वर्षाला ४० रु. + २० रु. असे एकूण ६० रुपये भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी ४०० रु. (परदेशातील व्यक्तीसाठी १०० डॉलर) हितचिंतकासाठी १००० रु. (परेशातील व्यक्तीसाठी २५० डॉलर) किंवा जास्त; आश्रयदात्यासाठी ५००० रु. (परदेशातील व्यक्तीसाठी ५०० डॉलर) किंवा जास्त. (आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

**जाहिरातीसाठी दर**

पूर्ण पान ७५० रु. अर्धे पान ४०० रु. , पाव पान २५० रु. , शुभेच्छासूचना १०० रु. , आवरणपृष्ठ चार १००० रु. , आवरणपृष्ठ दोन/तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

नोंदणी क्रमांक 040048/83

मराठी अभ्यास परिषदेच्या वतीने

# संगणक आणि मराठी भाषा

## प्रदर्शने आणि चर्चासत्र

पुणे येथे झाले होते. त्यानिमित्त प्रकाशित झालेली

## पुस्तिका

आता उपलब्ध आहे.

मॅक्सीन बर्न्सन, अशोक रा. केळकर, निनाद माटे,
कूपर–जोशी–चितळे, अर्जुनवाडकर, गायकैवारी
यांचे माहितीपूर्ण व विचारप्रवर्तक लेख

वि. द. आपटे यांची संगणक परिभाषा (इंग्रजी–मराठी)
पुण्यातील संगणक शिक्षणाच्या सोयींची एक उपयुक्त सूची

**किंमत ५ रुपये**

**संपर्क**
मराठी अभ्यास परिषद,
१, शीतल अपार्टमेंट
४६/४ एरंडवन, पुणे ४११००४
(दूरध्वनी ३३३८६९)